# सार्थ परमामृत.

भाषांतरकार-

## नारायण हरि भागवत.




मुंबईमध्यें

पांडुरंग जावजी

यांनीं आपल्या "निर्णयसागर" छापखान्यांत

छापून प्रसिद्ध केलें.

---

आवृत्ति पांचवी.

---

शके १८४५. सन १९२३.

---

किंमत ८ आणे.



# प्रस्तावना.

मूर्ति लहान परंतु कीर्ति मोठी अशा प्रकारचा हा छोटेखानी **मुकुंदराजकृत परमामृत** नांवाचा ग्रंथ आहे. या ग्रंथांत एकंदर १४ प्रकरणें असून त्यांचा विस्तार फक्त ३२३ ओव्यांत आहे, तथापि अर्थप्रमेयानें त्यानें ब्रह्मांडास गवसणी घातली आहे! या ग्रंथांत जशी ज्ञान्याची तशीच अज्ञान्याचीही गति चालते– परंतु आस्थापूर्वक मनन करून ह्या ग्रंथाचे वारंवार पाठ केले पाहिजेत. वर सांगितल्याप्रमाणें या ग्रंथाचे वारंवार पाठ केले असतां वाचक सद्भाववृत्तीचा असेल, तर ब्रह्मसाक्षात्काराच्या योग्यतेला येईल, व अन्य प्रसंगीं बहुभाष अथवा मार्मिक वाचाळ होईल, असा या प्रसादरूपी ग्रंथाचा जागृत प्रभाव आहे. मनुष्यपणांत आल्यावर देहाची वास्तविक अवस्था काय आहे, व त्या अवस्थेवरून त्याची खरोखर किंमत आहे कीं काय, व त्या देहाला लौकिकरूपी अमोलता आणण्याकरितां त्या देहानें कोणत्या प्रकारच्या क्रिया केल्या पाहिजेत, व त्या क्रिया यथास्थितपणें आचरणशुद्ध केल्या असतां देहबुद्धीनें आंगांत कोणत्या प्रकारचें अद्भुत बल भासत असतें, मनाला किती अपूर्व प्रकारचा उल्हास भासत असतो, व त्या योगानें काय पाहिजे तें करण्याच्या शक्तीचा आपल्या आंगांत किती संचार होत असतो वगैरे अभ्यासानें अनुभवून प्रत्यक्ष या जन्मीं व याच देहांत पाहाण्यासारख्या अंतःकरणसुरम्य गोष्टी अनेक आहेत, त्या समजण्यास हा ग्रंथ एक उत्तम साधन झालें आहे. या ग्रंथांत प्रथमतः सांप्रदायाप्रमाणें मंगलाचरण ह्मणजे गुरुरूपी ईशस्तवन करून दुसऱ्या प्रकरणापासून तों चवदाव्या प्रकरणापर्यंत ईशस्तवनांत प्रतिपादन केलेली गोष्ट प्रत्यक्ष अनुभवानें कशी साक्षात्काराला येऊन पोंचते, ती क्रमशः अन्यमत-खंडनापासून तों मुक्तिरहस्यापर्यंत सांगितली आहे. आणि शेवटल्या साक्षात्कार-प्रकरणांत योगिराज **मुकुंदराज** यांनीं "ह्या बुद्धि जो अनुभविया ॥ तो पाहे परतोनियां ॥ आपलें स्वरूप ॥" असा आशीर्वाद देऊन ठेविला आहे. तेव्हां हा आशीर्वाद फलद्रूप करून घेण्याची ज्यांची इच्छा असेल, त्यांनीं या अद्भुत-रूपी ग्रंथाचें जरूर जरूर सेवन करावें. या ग्रंथरूपी **परमामृताची** गोडी लागल्याकारणानें प्रस्तुतचा सार्थ प्रकार योगिराज **मुकुंदराज** यांच्या आशी-र्वादाचा प्रभाव आहे.



# अनुक्रमणिका.


| प्रकरण. | विषय | | | ओंव्या | पृष्ठ. |
|---|---|---|---|---|---|
| १ लें. | मंगलाचरण. | .... | .... | २२ | १– ५ |
| २ रें. | अन्यमतखंडण. | .... | ... | १९ | ६– ९ |
| ३ रें. | महावाक्यविवरण. | .... | .... | २१ | १०–१३ |
| ४ थें. | स्थूलदेहनिरसन. | .... | .... | २९ | १४–१८ |
| ५ वें. | लिंगदेहनिरसन. | .... | .... | ३३ | १९–२४ |
| ६ वें. | कारणदेहनिरसन. | .... | ... | १८ | २५–२८ |
| ७ वें. | महाकारणदेहनिरसन. | | .... | १७ | २८–३१ |
| ८ वें. | शून्यखंडन. | ... | .... | १७ | ३१–३४ |
| ९ वें. | अभ्यासयोग. | .... | .... | २१ | ३५–३८ |
| १० वें. | दृश्यभासखंडन. | .... | .... | ३० | ३९–४४ |
| ११ वें. | अज्ञानखंडन. | .... | ... | २९ | ४५–५० |
| १२ वें. | स्वानुभवसुखवर्णन. | | .... | १३ | ५०–५३ |
| १३ वें. | मुक्तिरहस्य. | ... | .... | २९ | ५३–५८ |
| १४ वें. | साक्षात्कार. | .... | .... | २५ | ५८–६३ |






# लौकिकचरित्र.

ज्या महात्म्यांच्या चरित्राचा आद्यंत भाग निरंतर गुलदस्तांत असतो, त्यांच्या मध्यचरित्रांतील भाग अद्भुत विचारांनीं परिपूर्ण असतो असा एक साधारण नियम असल्यासारखेंच दिसतें. तशाच मासल्याचें **मुकुंदराज** महाराजांचें चरित्र आहे. **मुकुंदराज** महाराजांच्या जन्मस्थानाचा पत्ताच कोठें लागत नाहीं, इतकेंच नाहीं, तर त्यांच्या कुलगोत्राचाही अद्याप कोणाला पत्ता लागलेला नाहीं! या चरित्रमूर्तींचा उदय साधुसंतांना कारागृहवासांतून सोडविण्याकरितां झाला अशी परंपरेनें चालत आलेली एक दंतकथा आहे. भरतखंडांत शके ९०० च्या सुमारास जयत्पाळ या नांवाचा कोणी एक महापराक्रमी राजा होऊन गेला. त्याला **ब्रह्मस्वरूप** पहाण्याची अति उत्कट इच्छा झाली असल्याकारणानें, जो साधु आपल्या नगरांत येईल, त्याचें सामोपचारानें यथाविधि जयत्पाळानें षोडशोपचारयुक्त पूजन करून अति नम्रतेनें त्या साधूची विनंति करावी, कीं महाराज, कृपा करून **ब्रह्मस्वरूपदर्शन** मला द्या. ही राजाची विनंति सफळ झाली नाहीं, ह्मणजे राजानें तत्काळ त्या साधूस कारागृहवासास पाठवून दिवसास तळें खोदण्याच्या कामावर त्याची नेमणूक करावी. असा क्रम कैक दिवस चालू असल्यानें हजारों साधुसंत कारागृहवासांत पडून तळें खोदण्याच्या कामावर लागले. साधुसंत तळें खोदीत आहेत, राजरक्षक त्यांच्याभोंवतीं व वेशीवर पहारा करीत आहेत, अशा समयास **मुकुंदराजनामें** अष्टवर्षात्मक तेजःपुंज मूर्ति **नारायणनामाचा** गजर करीत करीत **जयत्पाळ** राजाच्या नगराच्या वेशींत शिरली. त्या दिव्य मूर्तीकडे पाहून वेशीवर असलेल्या राजरक्षकांनीं अनेक प्रकारांनीं **मुकुंदराजांस** विनंति केली, कीं महाराज, आपल्यासारख्या कोमल बालतनूला आमचा राजा कारागृहवासांत पाठवील, याजकरितां आपण नगरांत जाऊं नये. **मुकुंदराजांनीं** आपला जाण्याचा आग्रहच दाखविला, आणि निघाले ते थेट राजवाड्यांतच शिरले. इतक्यांत **जयत्पाळाची** आणि **मुकुंदराजांची** गांठ पडतांच **ब्रह्म** दाखवा अशी राजानें

विनंति केली. लगेच मुकुंदराजांनीं सरंजाम घालून घोडा तयार करून आणण्याची राजास आज्ञा केली. राजाज्ञेप्रमाणें घोडा तयार होऊन येतांच मुकुंदराजांनीं जयत्पाळ राजास सांगितलें, कीं राजा, दुसऱ्या रिकिबींत पाय टाकण्यापूर्वीं तुला आतां ब्रह्मस्वरूपदर्शन करून देतों. रिकिबीवर पाय ठेव. हे मुकुंदराजांच्या तोंडचे शब्द ऐकतांच राजानें रिकिबीवर पाय ठेवला आणि दुसरा पाय उचलला, इतक्यांत मुकुंदराजांनीं जो एक चाबुकाचा सपाटा राजासह घोड्याला मारला त्याबरोबर घोडा राजासह जो ठाणावर उभा राहिला, तो सारखा सात दिवस चौकांतच उभा होता. घोड्याची किंवा राजाची हालचाल ह्मणून कांहीं नाहीं. अशा प्रकारें राजाची घोड्यावर सात दिवस सारखी समाधि लागल्यावर आठवे दिवशीं समाधि उतरवून मुकुंदराजांनीं जयत्पाळास विचारिलें, कीं राजा, ब्रह्मस्वरूपदर्शन झालें का? तेव्हां घोड्यावरून खालीं उतरून जयत्पाळ राजानें मुकुंदराजांस साष्टांग नमस्कार घातला, आणि तो मोठ्या नम्रतेनें व आदरपूर्वक ह्मणाला, कीं महाराज, आपल्या कृपेनें सर्व हेतु परिपूर्ण झाले. काय असेल ती आपली आज्ञा दासास व्हावी. नंतर मुकुंदराजांच्या आज्ञेनें जयत्पाळराजानें सर्व साधुसंतांस कारागृहवासांतून सोडवून आणिलें आणि त्या सर्वांचा मोठा गौरव करून त्या सर्वांना इच्छित ठिकाणीं जाण्याची परवानगी दिली. या वेळीं मुकुंदराजांनीं जातांना जयत्पाळ राजाकरितां 'परमामृत' नांवाचा ग्रंथ तयार केला. आणि हाच प्राकृत भाषेंतील ग्रंथांत आद्य ग्रंथ आहे. त्याचें माहात्म्य थोडक्यांत प्रस्तावनालेखांत सांगितलें आहे.







# परमामृत.

## प्रकरण १ लें.

### मंगलाचरण.

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीसरस्वत्यै नमः ॥ श्रीगुरुभ्यो नमः ॥

ॐ ॐ

नमो श्रीसद्गुरुनाथा ॥
तूं परमप्राप्तीचा दाता ॥
कृपासिंधू जी समर्था ॥
अनंता अपारा ॥ १ ॥

अहो श्रीसद्गुरुनाथ, आपल्या चरण-कमलावर मस्तक ठेवून अनन्यभावानें मी नमन करतों. कां ह्मणाल, तर आपण परमप्राप्तीचे दाते आहांत; ह्मणजे, आपण जी देणगी देतां, तशी देणगी देण्याचें सामर्थ्य दुसऱ्या कोणाच्याही अंगीं नाहीं; आणि आपण तर केवळ कृपेचे सागरच असून कृपा करण्याविषयीं समर्थ आहांत. इतकेंच नाहीं, परंतु महाराज, आपण अनंत आणि अपार, ह्मणजे अंत-रहित आणि सीमारहित असे आहांत.(१)

तूं आनंदमय स्वयंप्रकाश ॥
कैवल्यदाता परम ईश ॥
तूं निजरूपें अविनाश ॥
निराकार ॥ २ ॥

आणखी, आपण आनंदमय असून स्वयंप्रकाश अर्थात् स्वतेजानें प्रकाशमान असून कैवल्यदाते ह्मणजे मोक्ष देणारे, परम ईश अर्थात् देवाधिदेव आहांत. असे जे आपण, ते निजरूपें ह्मणजे आपल्या स्वतःच्या स्वरूपानें अविनाश असून निराकार आहांत. (२)

| | |
|---|---|
| तूं निःसंग निरंजन ॥<br>तूं निरंतर अभिन्न ॥<br>नाहीं तुजसमान ॥<br>कोणी देवा ॥ ३ ॥ | शिवाय आपण निःसंग अर्थात् इंद्रियांच्या इच्छेप्रमाणें न वागणारे ह्मणून निरंजन ह्मणजे निष्कलंक, आणि निरंतर अभिन्नत्वानें असणारे ह्मणून आपली बरोबरी करणारें, हे सद्गुरुनाथ देवा, दुसरें कोणी नाहीं. (३) |
| तूं जंव कृपा करिसी ॥<br>तंव संसारबंधना तोडिसी ॥<br>अविद्येपासूनि सोडविसी ॥<br>तारिसी जीवा ॥ ४ ॥ | त्या अर्थीं, हे सद्गुरुनाथा, आपणच कृपा कराल, तर अविद्येपासून सोडवून संसारबंधन तोडाल, आणि जीवाचा तरणोपाय होईल. (४) कां कीं— |
| न होय जें देवां असुरां ॥<br>तें तुझें करणें दातारा ॥<br>समर्थ न देखों दुसरा ॥<br>तुजवांचुनी ॥ ५ ॥ | जीवाचा तरणोपाय देव आणि असुर यांच्यानें होण्यासारखा नाहीं. तो करण्याबद्दल, हे देवा सद्गुरुनाथा, आपल्यावांचून समर्थ असा मला कोणीच दिसत नाहीं. (५) |
| आणिका कवणा नमस्कारूं ॥<br>कवणाचें स्तवन करूं ॥<br>जयजयाजी श्रीगुरु ॥<br>अगाधमहिमा ॥ ६ ॥ | तर हे सद्गुरो, मी आपल्यावांचून दुसऱ्या कोणाला नमस्कार करूं ? अथवा दुसऱ्या कोणाचें स्तवन करूं ? ह्मणून हे अगाधमहिमा श्रीगुरो, मी आपलाच जयजयकार करतों. (६) |
| जैसा सर्व पटामाजी एक तंतू ॥<br>तैसा तूं विश्वीं विश्वभरितु ॥<br>सर्व व्यापूनि विरहितु ॥<br>अलिप्त तूं ॥ ७ ॥ | महाराज, सर्व पट जसा केवळ तंतूंनी भरलेला असतो, त्याप्रमाणें आपण विश्वांत विश्व भरून आहांत. आणि त्यांत नवल हें, कीं सर्व विश्वाला व्यापून आपण विश्वरहित अलिप्त असे आहांत ! ह्मणजे आपण विश्वांत आहांत, परंतु आहांत तेही असून नसल्यासारखे आहांत ! (७) |
| हीं अनेक सगुणरूपें ॥<br>तूं धरिसी आपुलेनि व्यापें ॥ | महाराज, आपण सर्वव्यापी असल्यानें अर्थात् आपल्या व्यापाच्या योगानें निरंतर अनेक सगुणरूपें धारण करून |

| | |
|---|---|
| शिवशक्तींचीं साकाररूपें ॥<br>दाविसी तूं ॥ ८ ॥ | त्यांत शिवशक्तीचीं ह्मणजे देव आणि देवी यांचीं साकाररूपें दाखवतां, अथवा धारण करतां. (८) |
| तुजवीण अन्य न देखों कोणी ॥<br>ह्मणोनि आणिकातें न मानीं ॥<br>हा मस्तक तुझिया चरणीं ॥<br>ठेविला सत्य ॥ ९ ॥ | या सर्व प्रकारांवरून, हे सद्गुरो, आपल्यावांचून मला तर दुसरा कोणीच दिसत नाहीं. ह्मणून दुसऱ्या कोणाला न मानतां सत्य सत्य मी आपल्या चरणांवर मस्तक ठेवतों. (९) |
| तूं शुद्धात्मा स्वयंज्योती ॥<br>तुझी सर्वत्र ज्ञानदीप्ती ॥<br>नमो नमो जी श्रीगुरुमूर्ती ॥<br>आनंदविभो ॥ १० ॥ | महाराज, आपण स्वयंज्योत शुद्धात्मा असल्यानें सर्वत्र आपली ज्ञानदीप्ती आहे. अशा आनंदविभो श्रीगुरुमूर्ते, आपल्याला द्विवार नमस्कार करतों. (१०) |
| तूं ब्रह्मारूपें उत्पत्ती करिसी ॥<br>विष्णुरूपें प्रतिपाळिसी ॥<br>रुद्ररूपें संहारिसी ॥<br>पुनरपि रचावया ॥ ११ ॥ | महाराज, ब्रह्मदेवरूपानें आपण सृष्टीची उत्पत्ति करतां, विष्णुरूपानें तिचें प्रतिपालन करतां, आणि पुन्हां सृष्टीची रचना करण्याच्या हेतूनें रुद्ररूपानें तिचा संहार करतां. (११) त्या अर्थीं— |
| तूं सर्वसाक्षी सर्वज्ञ ॥<br>तूं सर्वविद्याविद प्राज्ञ ॥<br>तूं तत्वार्थें जीवसंज्ञ ॥<br>सर्वेश्वर ॥ १२ ॥ | महाराज, आपण सर्वसाक्ष आणि सर्वज्ञ आहांत; त्याचप्रमाणें सर्व विद्यांचे आपण जाणते अर्थात् गुरु आहांत. परंतु तत्वार्थानें, हे सर्वेश्वरा श्रीगुरुराया, आपल्याला जीव अशी संज्ञा आहे. (१२) |
| तूं जाणसी स्वरूपासी ॥<br>ह्मणोनि जाणीव स्फुरविसी ॥<br>परमात्मा ह्मणविसी ॥<br>यया उपाधीस्तव ॥ १३ ॥ | महाराज, आपण स्वरूपाला जाणतां ह्मणून जाणीव प्रगट होते, आणि ही जाणिवेची उपाधि लागल्याकारणानें आपण आपल्याला परमात्मा ह्मणवून घेतां. (१३) |

| | |
|---|---|
| तुझिये इच्छेचा विस्तारू ॥<br>विस्तारिलें हें चराचरू ॥<br>जीवअंश अपारू ॥<br>स्फुरसी तूंचि ॥ १४ ॥ | आपल्या इच्छेचा विस्तार तो हा चराचररूपानें विस्तारला असून, त्यांत जीवअंशानें आपणच स्फुरत आहांत! (१४)–त्या अर्थी– |
| सर्व जीवांची ज्ञप्तिकळा ॥<br>जगासी जाणे सकळा ॥<br>तो ज्ञानात्मा जिव्हाळा ॥<br>त्वंपदाचा तूं ॥ १५ ॥ | सकळ जगाला जाणणारी व सकळ जीवांत जीवअंशानें असणारी जी ज्ञप्ति-कला, त्या कलेचा शिवरूप जिव्हाळा, हे सद्गुरुराया, आपणच आहांत. (१५) |
| मायाअविद्यासंबंधें ॥<br>जीव ईश्वर होसी भेदें ॥<br>हाही आपुलेनि विनोदें ॥<br>खेळ तुझा ॥ १६ ॥ | ह्मणून माया आणि अविद्या यां-च्याशीं आपला संबंध जडल्यानें जीव-ईश्वरपणाचा भेद दाखविणारा खेळही आपलाच एक विनोद आहे! (१६) |
| तूं स्वानंद सदोदित ॥<br>असिपदीं तदात्मा अलिप्त ॥<br>पदातीत स्वयंभरित ॥<br>कैवल्य तूं ॥ १७ ॥ | तथापि ब्रह्मरूप असे आपण नित्य स्वानंदपूर्ण असून असिपदांतही अलिप्त असतां, त्या अर्थीं आपली स्वयंभरित कैवल्यस्थिति पदातीत आहे. (१७) |
| ऐसी करितां तुझी स्तुती ॥<br>मुकावल्या वेद श्रुती ॥<br>मग मी प्राकृत किती ॥<br>वर्णावया योग्य तुज ॥ १८ ॥ | महाराज, ज्यापेक्षां वेदांनीं अशी नाना प्रकारें आपली स्तुति करून मौन धारण केलें आहे, तेव्हां त्यांच्यापुढें आपलें वर्णन करण्याची माझी प्राकृताची काय योग्यता असणार?(१८)–असें जरी आहे, तथापि– |
| तूं प्रेमभरित परम पुरुष ॥<br>चतुर्विध वाचेचा ईश ॥ | महाराज, आपण प्रेमभरित परम-पुरुष असून चतुर्विध वाचेचे ईश अर्थात् स्वामी आहांत, त्या अर्थीं आपल्याला |

आतां देवा देईं मतिप्रकाश ॥
तुज जाणावया ॥ १९ ॥

जाणण्याबद्दल माझ्या मतीला आपण प्रकाश द्याच. (१९) कारण–

तूं कृपासिंधू जरी वरद होसी ॥
तरी अज्ञान जीवाचें फेडिसी ॥
मग लोपलें प्रगटविसी ॥
शिवत्व सिद्ध ॥ २० ॥

आपण कृपासिंधू आहांत, त्या अर्थीं आपण मला वरदान द्याल आणि जीवाच्या ठायीं असलेल्या अज्ञानाचा नाश करून लोपलेलें शिवत्व सिद्ध-प्रगट-कराल. (२०)

ह्मणोनि मी विनवीं शरणागत ॥
तूं ज्ञानसूर्य हृदयीं उदित ॥
तरी अविद्यातम क्षणांत ॥
फिटेल स्वामी ॥ २१ ॥

या हेतूनें मी आपल्याला शरण आलों आहें. त्या अर्थीं माझ्या हृदयमंदिरांत ज्ञानसूर्याचा उदय करून अविद्यारूप तमाचा क्षणार्धांत संहार होईल असें करा. (२१)

यावरी श्रीगुरु झाले प्रसन्न ॥
करविती परमार्थाचें कथन ॥
बोलेन सकल शास्त्रांचें मथन ॥
निर्वाण तेंचि ॥ २२ ॥

अशी प्रार्थना करतांच श्रीगुरु प्रसन्न झाले, आणि परमार्थाचें निरूपण करण्यास त्यांनीं मला आज्ञा केली. त्या आज्ञेच्या जोरावर सर्व शास्त्रांचें मथन करून त्यांतील निर्वाण तेंच मी आतां सांगतों. (२२)

इति श्रीपरमामृते मुकुंदराजविरचिते मंगलाचरणं नाम
प्रथमं प्रकरणं संपूर्णम् ॥ १ ॥



# प्रकरण २ रें.

## अन्यमतखंडण.

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीसरस्वत्यै नमः ॥ श्रीगुरुभ्यो नमः ॥

जें जाणोनि सर्व कीजे ॥
जें सर्वदा अभ्यासिजे ॥
जेथें परतोनि चित्तें राहिजे ॥
बुडी देउनी ॥ १ ॥

जें समजून घेतल्यावर कांहीं करणें तें सर्व करावें. आणि जें जाणल्यानंतर त्याचा अभ्यास करतां यावा ह्मणून ज्यांत चित्तानें परतून बुडी देऊन राहिलें पाहिजे. (१)

जें अभ्यंतरींचें ज्ञान ॥
प्रगट बोलेन साधन ॥
जेथें रतले योगिजन ॥
निरंतर ॥ २ ॥

असें जें अभ्यंतरीचें ज्ञान—ज्या ज्ञानांत योगिजन निरंतर रममाण झाले, तें साधनासह मी आतां स्पष्ट सांगतों.(२)

जैसें सागरींचें अमृत ॥
कां पय मथूनि काढिजे नवनीत
तैसें जें सार सर्वांत ॥
तेंचि सांगेन ॥ ३ ॥

तें अशा प्रकारचें सांगतों, कीं देव-दैत्यांनीं सागराचें मथन करून त्यांतून जसें अमृत काढलें, अथवा दुधाचें मथन करून त्यांतून जसें नवनीत काढावें, त्यांप्रमाणें सर्वांत सार असें जें कांहीं तेंच आतां मी सांगतों. (३)—ह्मणून—

नलगे यापरतें कांहीं करणें ॥
नाना परींचीं अभ्यासनें ॥
संकल्पविकल्पात्मक साधनें ॥
सर्व त्यजिजे ॥ ४ ॥

पहिल्यानें करा काय, कीं नाना प्रकारचे अभ्यास अथवा संकल्पविकल्पात्मक साधनें आहेत, त्या सर्वांचा त्याग करा. (४)

संकल्पविकल्पात्मक मतें ॥
नाना दर्शनें कष्ट ते ॥
जंव महावाक्यविवरण चित्तें ॥
अनुभवलें नाहीं ॥ ५ ॥

कारण, महावाक्याचें विवरण ह्मणजे त्वं, तत् आणि असि या तीन पदांचें ऐक्य जोंपर्यंत चित्तानें अनुभवलें नाहीं, तोंपर्यंत संकल्पविकल्पात्मक मतें आणि नाना प्रकारचीं शास्त्रें हीं सर्व कष्टमय असतात. (५)

ज़ों निरुपाधिस्वरूप ॥
अनुभविलें नाहीं आपोआप ॥
तोंवरी कष्टासि माप ॥
कवण करी ॥ ६ ॥

कारण निरुपाधिस्वरूप जोपर्यंत सहजीं अनुभवलें नाहीं, तोंपर्यंत जे कष्ट होतात, त्यांचीं गणनाही होत नाहीं. (६)

व्रतें तपें नियमांचिया सांकडीं॥
संदेहीं गुंतलीं बापुडीं ॥
तीं केंवि पावतील पैलथडीं ॥
संसारसागराचिये ॥ ७ ॥

व्रतें आणि तपें हीं नियमांच्या योगानें खडतर झालीं असून फळप्राप्तीविषयीं संशयात्मक असल्यानें संसाराच्या पैलतीरावर तीं बापडीं कशी पोंचतील ? (७)

पूजा स्नानें तीर्थीं दानें ॥
मंत्र यंत्र याग हवनें ॥
कीजे तितुकें फळ भोगणें ॥
स्वर्गादिक सर्वथा ॥ ८ ॥

पूजा, तीर्थावर स्नानें व दानें, त्याचप्रमाणें मंत्र, यंत्र याग आणि हवनें इत्यादि प्रकार केले असतां त्यांपासून स्वर्गसुखादि फलभोग प्राप्त होतात. (८) आणि

जप तप अनुष्ठानें ॥
आणि नानापरींचीं साधनें ॥
मोक्ष न पाविजे आत्मज्ञानें ॥
वांचोनियां सर्वथा ॥ ९ ॥

जप, तप, अनुष्ठान आणि नाना प्रकारचीं साधनें जरी केलीं, तथापि आत्मज्ञानावांचून मोक्षप्राप्ति होत नाहीं. (९) कारण—

जोंवरी जीवेश्वर उपाधी ॥
निरसूनि नेणिजे ऐक्यसिद्धी ॥
भेद सांडूनि शबलविरोधी ॥
शुद्ध स्वरूप न प्रकाशे ॥ १० ॥

जोंपर्यंत जीव आणि ईश्वर या उपाधींचा निरास झाला नाहीं, व जीव-शिवाचें ऐक्य लक्ष्यांत आलें नाहीं, तोंपर्यंत भेदबुद्धि मोडून मायेनें अनावृत असें शुद्ध स्वरूप प्रकाशमान होत नाहीं.(१०)

त्वंपद तत्पदींचें लक्ष ॥
शबल सांडोनि परोक्ष ॥
नेणिजे शुद्ध अपरोक्ष ॥
तंववरी मोक्ष कैंचा ॥ ११ ॥

उघडच आहे, कीं जीवाचें शिवाच्या ठिकाणीं लक्ष लागणें हा शबल भाग नाहींसा होऊन शुद्ध ब्रह्मपद प्रत्यक्षत्वानें जोंपर्यंत जाणलें नाहीं, तोंपर्यंत मोक्षप्राप्ती कशी होणार ? अर्थात् नाहीं. (११)

जोंवरी तो एक मी एक ॥
हा न तुटेचि कलंक ॥
जंव न प्रकाशे सम्यक ॥
तंव परम प्राप्ति न घडे ॥१२॥

त्यांचप्रमाणें जोंपर्यंत तो एक आणि मी एक अर्थात् त्याच्यापासून मी निराळा असला कलंकयुक्त दोष नाहींसा झाला नाहीं, आणि सम्यक्ज्ञानाचा प्रकाश झाला नाहीं, तोंपर्यंत परमप्राप्तीचा योग प्राप्त व्हावयाचा नाहीं. (१२)

जंववरी त्रिपदशोध न घडे ॥
अर्धमात्रापरतें न सांपडे ॥
क्षराक्षरनिवाडा न घडे ॥
उत्तम पुरुषीं समरस ॥ १३ ॥

आणि जोंपर्यंत त्रिपद अर्थात् त्वं, तत् आणि असि या पदांचा उलगडा झाला नाहीं, आणि अर्धमात्रेपलीकडील ह्मणजे उन्मनी स्थिति प्राप्त होऊन क्षर आणि अक्षर पुरुषांचा निवाडा लागून उत्तम पुरुषाच्या ठिकाणीं ऐक्यभाव झाला नाहीं, (१३)

सच्चिदानंदविवरण ॥
जंव नेणिजे कार्यकारण ॥
निवळेना शुद्ध आत्मज्ञान ॥
तंव मोक्ष कैंचा ॥ १४ ॥

आणि सच्चिदानंद, पदांतील कार्य कारणभाव समजला नाहीं तोंपर्यंत शुद्ध आत्मज्ञान नाहीं, आणि आत्मज्ञान नाहीं तोंपर्यंत मोक्षप्राप्ती कशी होणार ? (१४)

सद्गुरुमुखें वेदांतश्रवण ॥
न घडे तयाचें मनन ॥
जंव न पाविजे निजध्यासन ॥
तंववरी मोक्ष कैंचा ॥ १५ ॥

ह्मणून मोक्षप्राप्ती करून घेण्याकरतां सद्गुरूच्या मुखानें वेदांतश्रवण, श्रवण केलेल्याचें मनन, आणि केलेल्या मननाचा सारखा निजध्यास लागला नाहीं, तोंपर्यंत मोक्षप्राप्ती होणार नाहीं. (१५)

सांडूनि वेदांत सिद्धांत ॥
जे कां बोलती पाखांडमत ॥
त्यांची नायकावी मात ॥
महावाक्यार्थ अनुभविजे ॥१६॥

वेदांतसिद्धांत सांगण्याचें सोडून जे पाखांडाच्या गोष्टी बोलतील, त्यांची एकही गोष्ट न ऐकतां महावाक्यार्थाचा ह्मणजे त्वं आणि तत् पदांचें ऐक्य करून असिपदाचा अनुभव घेत जावा. (१६)

वेद बोलिला सृष्टिक्रम ॥
तो सांडूनि सकळ धर्म ॥

वेदांनीं सृष्टिक्रम सांगितला आहे, तो क्रम सोडून त्यांत जें सकल धर्माचें

| | |
|---|---|
| वेदांताचें निजवर्म ॥<br>लाहिजे गुरुमुखें ॥ १७ ॥ | निजवर्म सांगितलें आहे, त्याची गुरुमुखानें प्राप्ति करून घ्यावी. (१७) |
| वेदांताचें अबोलणें ॥<br>सिद्धांतींचें जाणोनि नेणणें ॥<br>जेथें मिळणी होय तें पावणें ॥<br>कैवल्यपद ॥ १८ ॥ | कारण बोलून बोलून थकल्यावर वेदांनीं ज्या ठिकाणीं मौन धारण केलें, आणि सिद्धांत जाणून ज्या ठिकाणीं नेणीव धरली, अर्थात् ज्ञान आणि अज्ञान या दोहींचाही निरास झाला, त्या ठिकाणीं जाणीव आणि नेणीव यांची मिळणी झाली. त्या मिळणीचेंच नांव कैवल्यपद. तें पद गुरूपासून प्राप्त करून घ्यावें. (१८) |
| जीवेश्वराची मिळणी ॥<br>होय परमपद निर्वाणीं ॥<br>तेथें द्वैतबुद्धीची कडसणी ॥<br>तुटोनि जाय ॥ १९ ॥ | अशा प्रकारें जीव-ईश्वराची मिळणी होऊन निर्वाण परमपदाची प्राप्ति झाली असतां द्वैतबुद्धीची कडसणी ह्मणजे गांठ तुटून जाते. (१९) |

इति श्रीपरमामृते मुकुंदराजविरचिते अन्यमतखंडणं नाम द्वितीयप्रकरणं संपूर्णम् ॥ २ ॥



# प्रकरण ३ रें.

## महावाक्यविवरण.

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीगुरुभ्यो नमः ॥

करूनि आदिशक्तीचा अंगीकारू ॥
जो करी उत्पत्तिस्थितिसंहारू ॥
सर्वसाक्षी सर्वेश्वरू ॥
तो शबल बोलिजे ॥ १ ॥

आदिशक्तीचा अर्थात् जगन्मातेचा अंगीकार करून जो सृष्टीची उत्पत्ति, स्थिति आणि संहार करतो, व जो सर्वसाक्षित्वानें सर्व देवांचा ईश्वर सर्वेश्वररूपानें नांदतो, त्याला शबल ह्मणतात. (१)

स्थूल दृष्टीचें जाणणें ॥
तितुकेंही निरसणें ॥
उरे अदृश्य जो द्रष्टेपणें ॥
तोचि शुद्ध परमात्मा ॥ २ ॥

परंतु ह्या शबल सर्वेश्वररूपांत स्थूल दृष्टीनें जाणतां येणाऱ्या रूपाचा निरास केल्यावर अदृश्यपणानें जें रूप द्रष्टेपणें अनुभवानें गोचर होतें, तें शुद्ध स्वरूप परमात्म्याचें होय. (२)

सर्वज्ञ आणि सर्वेश्वरू ॥
ऐसा सकळ शास्त्रांचा निर्धारू ॥
तोचि जाणिजे परात्परू ॥
ज्ञप्तिमात्र ॥ ३ ॥

आणि ह्याच स्वरूपाविषयीं सकल शास्त्रांनीं सर्वज्ञ आणि सर्वेश्वर असा निर्णय केला आहे, व ह्याच स्वरूपाला ज्ञप्तिमात्र परात्पर ह्मणतात. (३)

अनंत शक्तींचा द्रष्टा ॥
स्थान मान विरहित प्रतिष्ठा ॥
जया अपरिमित घनदाटा ॥
पार नेणिजे ॥ ४ ॥

असा तो परमात्मा अनंत शक्तींचा द्रष्टा असून स्थान, ( रहाण्याची जागा ) मान (इयत्ता) आणि प्रतिष्ठा यांविरहित असा अपरिमित घनदाट आहे, व ज्याचा कांहीं केल्या अंतच लागत नाहीं. (४)

तया बोलिजे शुद्ध ॥
निरसिजे शबलत्व अशुद्ध ॥
ज्ञानघनानंदसिद्ध ॥
परमेश्वर ॥ ५ ॥

त्याला शुद्ध स्वरूप अथवा शुद्धात्मा ह्मणतात. ह्मणून ही शुद्धस्वरूपप्राप्ति झाली असतां शबलत्वाचें निरसन होऊन ज्ञानघनानंदसिद्ध परमेश्वररूप बनतें. (५)



ब्रह्मांड हिरण्यगर्भ माया ॥
जो वेगळा या देहत्रया ॥
मूळप्रकृति महामाया ॥
यांविलक्षण जो ॥ ६ ॥

हा परमेश्वररूपी आत्मा ब्रह्मांड, हिरण्यगर्भ आणि माया ह्मणजे अनुक्रमें जागृति, स्वप्न आणि सुषुप्ति या देहाच्या ज्या तीन अवस्था आहेत, त्यांपासून वेगळा असून मूळप्रकृति जी महामाया तिच्याहूनही हा अगदीं निराळा आहे.(६)

उत्पत्ति स्थिति संहार ॥
सर्वसाक्षित्वाचा व्यवहार ॥
या अवस्थातीत अपार ॥
आपोआप जो ॥ ७ ॥

त्याचप्रमाणें सर्वसाक्षित्वाचे व्यवहार जे उत्पत्ति, स्थिति आणि संहार या व्यवहारांहून तो अतीत अर्थात् अगदीं बाहेर आहे. (७)

ब्रह्मा विष्णु रुद्र ॥
आणि चौथा हा सर्वेश्वर ॥
यांवेगळा अपरंपार ॥
शुद्ध ब्रह्म जो ॥ ८ ॥

त्याचप्रमाणें ब्रह्म, विष्णु, रुद्र आणि चौथा सर्वेश्वर या सर्व देवांच्याहूनही शुद्ध ब्रह्मस्वरूप अगदीं वेगळा असून तो अपरंपार मर्यादातीत आहे. (८)

याचिपरी पाहतां ॥
जीव अविद्याविरहिता ॥
काम्यकर्मातीता ॥
जाणिजे ऐसा ॥ ९ ॥

या पद्धतीनें पाहूं गेलें असतां असें लक्ष्यांत येतें, कीं जीव हा अविद्येरहित असून काम्यकर्मातीत ह्मणजे काम्यकर्मांच्या बाहेर आहे; अर्थात् जीव त्यांनीं लिप्त नाहीं. (९)

स्थूळ सूक्ष्म कारण ॥
चौथा देह महाकारण ॥
जागृती स्वप्न सुषुप्ती जाण ॥
तुरीया चौथी ॥ १० ॥

स्थूळ, सूक्ष्म, कारण आणि महाकारण असे चार प्रकारचे देह आहेत; त्याचप्रमाणें जागृती, स्वप्न, सुषुप्ती आणि तुर्या ह्या चार अवस्था अनुक्रमें चार देहांच्या आहेत. (१०)

विश्व तैजस प्राज्ञ ॥
प्रत्यगात्मा सर्वज्ञ ॥
हे अभिमानी संज्ञ ॥
शबल त्वंपदार्थीं ॥ ११ ॥

या चार देहांच्या चार अवस्थांचे विश्व, तैजस, प्राज्ञ आणि प्रत्यगात्मा अथवा सर्वज्ञ असे अनुक्रमें त्वंपद अर्थानें ह्मणजे जीव अथवा मीपणाचे चार शबल अभिमानी आहेत. (११)

या इतुकियांचा द्रष्टा ॥
तो ज्ञानघन तया प्रगटा ॥
शुद्धबोलिजे प्रतिष्ठा ॥
जीवत्व निरासे ॥ १२ ॥

या चार देहांचा, चार अवस्थांचा व चार अभिमानांचा द्रष्टा जो, त्यानें जीवत्वाचा निरास केला ह्मणजे तोच ज्ञानघन शुद्ध आत्म्याच्या प्रतिष्ठेस अर्थात् योग्यतेस येऊन प्रगट होतो.(१२)

शवल तो वाच्यपक्ष ॥
शुद्ध बोलिजे लक्ष ॥
लक्षीं ऐक्य जाणितल्या मोक्ष-॥
सिद्धीचि लाभे ॥ १३ ॥

ह्मणून वाच्यपक्ष ह्मणजे जितका बोलण्याचा भाग, तितका शवलपक्ष असून लक्षानें अर्थात् एकाग्र अंतःकरणानें घेण्याचा तितका भाग शुद्ध पक्ष होय. आणि त्या शुद्धपक्षांश भागांत जीवशिवांचें ऐक्य होण्यावरोवर मोक्षसिद्धि लाभते. (१३)

दोन्हीं नयनीं एक दृष्टी ॥
दोन्हीं श्रवणीं एक नाद उठी ॥
दोन्हीं अधरपुटीं ॥
एकचि शब्द ॥ १४ ॥

डोळे दोन, परंतु दृष्टि एक; कान दोन परंतु उठणारा नाद एक; ओंठ दोन, परंतु शब्द एक (१४)

तैसें दोहीं पदींचें विवरण ॥
करितां जीवेश्वराचें निरसन ॥
शुद्ध लाधे तया कवण ॥
द्वैत कल्पी ॥ १५ ॥

त्याप्रमाणें जीव शिव या दोन पदांचें विवरण करीत असतां त्यांत जीव व ईश्वर या दोन पदांचें निरसन होऊन त्यांतच शुद्धपद सांपडल्यावर मग द्वैताची कल्पना कशी होणार? (१५)

जैसें महदाकाश अखंड पूर्ण ॥
घटमठीं दिसे भिन्न ॥
घटमठाकाश ऐसें जाण ॥
बोलती तया ॥ १६ ॥

याला दृष्टांत असा पहा, कीं महदाकाश हें अखंड पूर्ण ह्मणजे सर्वत्र व्यापलेलें आहे. अर्थात् आकाश कोठें नाहीं असें स्थळच नाहीं. असें असतां घट ह्मणजे भांडें आणि मठ ह्मणजे आश्रम या दोहींतील अवकाशाला घटाकाश व मठाकाश असें ह्मणतात. (१६)

ते घट मठ दोन्ही भंगतां ॥
ठायींचेंचि ऐक्य तत्वतां ॥
तैसें जीवेश्वर उपाधी निरसतां ॥
स्वस्वरूप एक ॥ १७ ॥

त्याच घटाचा आणि मठाचा भंग होतांच घट मठ या आकाशाच्या उपाधी जाऊन मूळचेंच ऐक्य होतें. तद्वत् जीव आणि ईश्वर या उपाधींचा निरास होतांच मूळचेंच स्वरूप राहातें. (१७)

माया-अविद्या-नाशीं ॥
ऐक्य होय जीवेश्वरासी ॥
ऐसें बुझोनियां मानसीं ॥
सुखिया होइजे ॥ १८ ॥

ह्मणून माया आणि अविद्या यांच्या नाशावरोबर जीव आणि ईश्वर यांचें ऐक्य होतें असें समजूं लागतांच सुख वाटूं लागतें. (१८)

माया-अविद्येसी पाहतां ॥
विरोध भासे उभयतां ॥
ह्मणोनि शबलत्यागें शुद्ध घेतां ॥
अखंड एकरस ब्रह्म ॥ १९ ॥

परंतु माया आणि अविद्या या दोहीं-विषयीं विचार करतां त्या शबल ह्मणजे आत्मस्वरूपप्राप्तीविषयीं विरोधी असल्यानें त्यांचा त्याग करून शुद्धाचा अंगीकार करावा तेव्हां अखंड-एकरस-ब्रह्म-स्थिति होते. (१९)

ऐसेंनि महावाक्यविवरणें ॥
त्वंपद तत्पद शोधणें ॥
असिपदीं पावणें ॥
ऐक्यसिद्धी ॥ २० ॥

अशा प्रकारें महावाक्याचें विवरण ह्मणजे त्वं आणि तत् या दोन पदांचें शोधन करून असिपदप्राप्तीनें ऐक्य-सिद्धि प्राप्त करावी. (२०)

ह्मणोनियां दृष्टीविण ॥
सकळ भेदमतें जाण ॥
तें बोलिजे खंडज्ञान ॥
मायिक व्यवहार ॥ २१ ॥

तीही याच दृष्टीनें केली पाहिजे. कारण सर्व भेदमतें ह्मणून जितकीं आहेत, तीं मायिक व्यवहाराचीं असल्यानें अखंड ज्ञानप्राप्तीचीं नाहींत. (२१)

इति श्रीपरमामृते मुकुंदराजविरचिते महावाक्यविवरणं नाम तृतीयप्रकरणं संपूर्णम् ॥ ३ ॥

---

# प्रकरण ४ थें.

## स्थूलदेहनिरसन.

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीगुरुभ्यो नमः ॥

आतां अद्वैत पहाणें ॥
तें दुसरें करूनियां जाणणें ॥
पुनरपि मुरवणें ॥
ठायींच्या ठायीं ॥ १ ॥

मागच्या प्रकरणाप्रमाणें अद्वैत पहाणें ह्मणजे प्रथमतः द्वैत निर्माण करून अद्वैत जाणून अर्थात् समजून घेतल्यावर दृष्टि पुन्हां जागच्या जागीं आणून मुरवावी. (१)

उफराटें दृष्टीचें पहाणें ॥
जें दृष्टीमाजी दृष्टी मुरवणें ॥
पहातया मूळासी जाणें ॥
स्वस्वरूपासी ॥ २ ॥

ह्मणजे साहजिक समोरचा झोंक उफराटा करून दृष्टींत दृष्टि मुरवून पाहाणाऱ्या स्वरूपाच्या मूळाशीं जाऊन पहाणें. (२)

तेथूनि परतें पाहतां ॥
नाहीं पहाणें सर्वथा ॥
दुमदुमित अखंडिता- ॥
माजी पडिजे ॥ ३ ॥

तें स्वरूप दृष्टीस पडलें असतां त्याच्या पलीकडे पहाणेंच कांहीं उरत नाहीं. कारण स्वरूपापर्यंत एकदां मजल पोंचली ह्मणजे दुमदुमित अशी अखंड स्वरूपमय स्थिति होते. ह्मणजे परब्रह्मस्वरूपावांचून दुसरें कांहींच दिसत नाहीं. ( ३ )

जेथें नाहीं माया अविद्या ॥
जे अपरिमित स्वसंवेद्या ॥
ते सांगों ब्रह्मविद्या ॥
सावधान परियेसा ॥ ४ ॥

त्या दुमदुमित अखंड स्वरूपांत माया अविद्येचा संपर्क नाहीं आणि जें स्वरूप अपरिमित असून स्वसंवेद्य आहे, तें जाणण्याची ब्रह्मविद्या सांगतों, करितां अवधान दे. (४)

जे घनानंद सुखाची राशी ॥
प्रवेशोनि तये स्वप्रकाशीं ॥
असिजे गमनागमनासी ॥
नासोनि सदा ॥ ५ ॥

ही ब्रह्मविद्या घनानंद ह्मणजे अलोट सुखाची रास असल्यानें तिच्यांत का एकदां प्रवेश झाला ह्मणजे प्रवेश करणाऱ्याच्या मनाची जा ये अथवा चलविचल बंद होऊन तो स्वप्रकाशांतच राहतो. (५)

तें साधावें कवणे रीतीं ॥
जेणें होय नित्यतृप्ती ॥
ते युक्ति ऐकावी सुनिश्चितीं ॥
एकाग्र होऊनि ॥ ६ ॥

त्या विद्येचें साधन कोणत्या रीतीनें केलें असतां नित्यतृप्ति होईल असी एक युक्ति सांगतों, ती एकाग्रतेनें ऐक. (६)

परी आधीं सांगों साधन ॥
आत्मस्वरूपाचें परिज्ञान ॥
तें जाणितल्याविण ॥
काय ध्यावें ॥ ७ ॥

कारण ज्याचें ध्यान करावयाचें तें समजण्याकरतां आत्मस्वरूपाच्या परिज्ञानाचें साधन आधीं सांगतों. नाहींतर तें समजल्यावांचून कशाचें ह्मणून ध्यान करावें ? ( ७ ) याकरतां–

आधीं आत्मयातें जाणावें ॥
मग तयातें साधावें ॥
येरवीं नुसतें अनुभवावें ॥
काय धरूनी ॥ ८ ॥

अधीं आत्मस्वरूपाला समजून घ्यावें, आणि मग आत्मा साध्य होईल अशा खटपटीला लागावें; नाहींतर मूळांतच कांहीं समजलें नाहीं तर ध्यान करून अनुभव तरी कशाचा घ्यायाचा ? ( ८ )

ज्या युक्तीं स्वरूप एक ॥
जाणणें ते बुद्धि ऐक ॥
मी आहें हें तंव निष्टंक ॥
जाणसी तूं ॥ ९ ॥

आतां साधनावर लक्ष दे. ज्या युक्तीनें एक स्वरूप जाणतां येतें, त्या युक्तीचें नांव बुद्धि. त्या बुद्धीनें मी आहें, येवढी गोष्ट तूं खात्रीलायक जाणतोस. (९) ह्मणजे–

ऐसें तंव जाणसी ॥
परी मी कोण हें नेणसी ॥
तरी कां आपआपणासी ॥
बुझेसि ना ॥ १० ॥

त्या बुद्धीनें मी आहें एवढें तुला समजतें, परंतु मी कोण आहें हें मात्र तुला समजत नाहीं ! तरी तूं आपल्या स्वतांला कां ओळखूं नयेस ? (१०) त्याला कारण आहे. ते हें कीं–

तूं कोण कोठूनि कैंचा ॥
आला गेलासि तरी साचा ॥
परी पालव न धरिसी विचाराचा ॥
आपणा जाणावया ॥ ११ ॥

तूं कोण आहेस ? कोठून आलास ? आणि जाणार कोठें ? इत्यादि गोष्टी समजून घेण्याच्या विचाराचा लवलेशही तुझ्या मनांत येत नाहीं ! (११)

तूं देह कीं देहाचा जाण ॥
देह तुज जाणे कीं तूं जयाचें
ज्ञान ॥
पहातां द्रष्टा तूं आपण ॥
देह तुज दृश्य ॥ १२ ॥

आतां थोडासा विचार कर, कीं तूं देह आहेस किंवा देहाचा जाणता आहेस? अथवा देह तुझा जाणता आहे? किंवा तूं देहाचें ज्ञान आहेस? ह्मणजे द्रष्टा तूं आणि देह तुला दृश्य आहे असेंच दिसेल. (१२)

देहा सबाह्य अंतरीं ॥
तूं जाणसी गा विचारीं ॥
देह अलंकाराचे परी ॥
मिरविसी तूं ॥ १३ ॥

आणखी काय होईल, कीं अंतर्बाह्य देहाला तूं जाणतोस त्या अर्थीं अलंकाराप्रमाणें देहाला तूं मिरवतोस असें विचाराअंतीं तुझें तुलाच वाटेल. (१३)

लेवोनि खोळी पंचभूतांची ॥
भूतीं मिरविसी तूंची ॥
जाणीव असे कीं याची ॥
तूजचि कीं ॥ १४ ॥

कारण पांच भूतांनीं तयार केलेली देहरूप खोळ तूं पांघरून त्या पंच भूतांत तूंच मिरवितोस, त्या अर्थीं पंचभूतांची जाणीव तूं आहेस. (१४)

ऐसें आपणिया जाण ॥
निरसी हा दृश्य गुण ॥
जे देह मी ह्मणतोसि आपण ॥
ते सांडीं भ्रांति ॥ १५ ॥

मग सहजच देहाचे आपण जाणते झालों. ह्मणजे देह मी हा जो दृश्य गुण त्याचा निरास होतो ह्मणून अज्ञानानें देहाला मी जें ह्मणतोस, ती भ्रांति आहे; तेवढी सोड. ( १५ )

देहाचिया अवयवां समस्तां ॥
तूंचि एक जाणता ॥
तो तुझा तूं आइता ॥
विचारूनि पाहीं ॥१६॥

देहाच्या सर्व अवयवांचा जाणता तूंच आहेस. तो तुझा तूं आइताच आहेस असेंही पण विचाराअंतीं तुला दिसून येईल. (१६)

रोम त्वचा नाडी मांस ॥
अस्थि हे पांच अंश ॥
कठीण हा धरणीचा भास ॥
जाणसी तूं ॥ १७ ॥

शरीराला चिकटून असणारे रोम, त्वचा, नाडी, मांस आणि अस्थि हे पांच कठीण अंश धरणी ह्मणजे पृथ्वीतत्वाचे आहेत, ते तूं जाणतोस. १७

लाळ मूत्र शोणित ॥
मज्जा रेत हे आप द्रवत ॥
या पांचां अंशांतें निश्चित ॥
जाणता तूं एक ॥ १८ ॥

लाळ, मूत्र, शोणित, मज्जा आणि रेत हे द्रवणारे पांच अंश आपाचे आहेत, यांनाही तूं जाणतोस. (१८)

क्षुधा तृषा आळस निद्रा ॥
मैथुन हे अंश वैश्वानरा ॥
या पांचांचिया व्यवहारा ॥
जाणसी तूं ॥ १९ ॥

क्षुधा, तृषा, आळस, निद्रा आणि मैथुन हे पांच अंश वैश्वानराचे ह्मणजे तेजतत्वाचे आहेत; त्यांचा व्यापारही तूं जाणतोस. (१९)

चलन धावन निरोधन ॥
प्रसरण आणि आकुंचन ॥
हे चंचल पांचही गुण ॥
वायूचे देखणा तूं ॥ २० ॥

चलन, धावन, निरोधन, प्रसरण आणि आकुंचन हे पांच चंचळ गुण वायूचे आहेत, त्यांचा पाहणारा तूंच आहेस. (२०)

काम क्रोध शोक जाण ॥
लोभ भय हे पांच गुण ॥
ते आकाशाचें लक्षण ॥
देखणा तूं ॥ २१ ॥

काम, क्रोध, शोक, लोभ आणि भय हीं आकाशाचीं पांच लक्षणें आहेत, त्यांचा पाहणाराही तूंच आहेस. (२१)

ऐसे पंचभूतांचे अंश ॥
जाणसी पंचवीस ॥
ते सर्वही तुज दृश्य ॥
स्थूळ देहीं ॥ २२ ॥

अशा प्रकारानें पांच भूतांच्या पंचवीस अंशांना तूं जाणत असून ते सर्वही स्थूळ देहांत तुला दृश्य आहेत. (२२)

याचे साही विकार जाण ॥
जायते अस्ति विवर्धन ॥
विपरिणमते वार्धक्य संहरण ॥
यासीच असे ॥ २३ ॥

त्याचप्रमाणें या देहाचे सहा विकार अथवा अवस्था ह्मणजे (१) जायते ( उत्पन्न होणें ), (२) अस्ति (अस्तित्व असणें), (३) विवर्धन (वाढणें), (४) विपरिणमते (वाढ पूर्ण होणें), (५) वार्धक्य ( अपक्षीयते–वृद्धपण ) आणि (६) संहरण (नश्यति–नाश) (२३)यांना आणि—

| | |
|---|---|
| याचे वर्ण व्यक्तिरूपासी ॥<br>जाणसी याचिया नामासी ॥<br>ह्मणोनि तुज आत्मयासी ॥<br>हे विजाती कैंची ॥ २४ ॥ | या देहाच्या वर्णाला, व्यक्तिरूपाला आणि नांवाला जाणणारा ज्या अर्थी तूं आहेस, त्या अर्थी देह आत्म्यापासून विजाती ह्मणजे भिन्न आहे हा सहजच प्रश्न निघतो. (२४) परंतु— |
| तूं आत्मा निराकार ॥<br>जाणसी या देहाचा आकार ॥<br>जरी काष्ठीं अग्नीचा संचार ॥<br>तरी वेगळा कीं ॥ २५ ॥ | तूं आत्मा स्वरूपानें निराकार असून या देहाच्या आकाराला जाणणारा आहेस. याला दृष्टांत काष्ठांत अग्नीचा संचार असून अग्नि जसा काष्ठापासून वेगळा असतो, तसा तूं देहांत असून देहापासून वेगळा आहेस. (२५) |
| तैसा तूं यासी व्यापूनि ॥<br>अससी या स्थूळातें भरूनि ॥<br>रोमांच आदि अग्र करूनि ॥<br>जाणता तूं ॥ २६ ॥ | परंतु काष्ठांतील अग्नीप्रमाणें या स्थूळ देहाला सर्वत्र व्यापून तूं भरलेला असल्याकारणानें केंसाच्या आदि अग्राला देखील तूं जाणतोस. (२६) |
| परि हे तुज नेणे ॥<br>तूंचि अससी जाणपणें ॥<br>तो तूं आत्मा आपण ॥<br>नव्हेसी नरनारी ॥ २७ ॥ | परंतु स्थूळ देह व इंद्रियें हीं तुला जाणत नाहींत, कारण जाणपणा तुझा आहे. आणि जाणपणा हेंच जें आत्मस्वरूप त्या स्वरूपाच्या ठिकाणीं स्थूळांत दिसणारा नरनारीभाव नाहीं. (२७) |
| आत्मयाचेनि जागेपणें ॥<br>इंद्रियद्वारा भोगणें ॥<br>बाह्य व्यापार करणें ॥<br>विषयांचे घडे ॥ २८ ॥ | तथापि आत्मस्वरूपाच्या जागृतीमुळें स्त्रीपुरुषभावांत इंद्रियें बाह्य व्यापार करून विषयांचे भोग घेतात. (२८) |
| मी अमुका नामरूपाचा ॥<br>ऐसा हा अभिमान विश्वाचा ॥<br>तूं जाणता या सर्वांचा ॥<br>विलक्षण ॥ २९ ॥ | ह्मणून मी अमुक नांवारूपाचा आहें, असा जो अभिमान असतो तो विश्वाचा असून, ह्या सर्वांचा जाणता तूं एक विलक्षणच आहेस. (२९) |

इति श्रीपरमामृते मुकुंदराजविरचिते स्थूलदेहनिरसनं नाम चतुर्थप्रकरणं संपूर्णम् ॥ ४ ॥

# प्रकरण ५ वें.

## लिंगदेहनिरसन.

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीसरस्वत्यै नमः ॥ श्रीगुरुभ्यो नमः ॥

तुज श्रवणांतूनि ऐकणें ॥
त्वचेंतूनि स्पर्श घेणें ॥
नयनांतूनि देखणें ॥
नाना रूपांतें ॥ १ ॥

श्रवणांतून ऐकणें, त्वचेनें स्पर्श घेणें, आणि नयनांनीं नानाप्रकारचीं रूपें पहाणें (१)–त्याचप्रमाणें—

जिव्हेंतूनि स्वाद घेसी ॥
घ्राणांतूनि परिमळ जाणसी ॥
वाचेंतूनि उच्चारिसी ॥
अक्षरें सर्व ॥ २ ॥

जिव्हेनें स्वाद घेणें, घ्राणानें परिमळ जाणणें आणि वाचेनें सर्व अक्षरांचा उच्चार करणें(२)–त्याचप्रमाणें—

करांतूनि घेणें देणें ॥
पायांतूनि चालणें ॥
शिस्नांतूनि रति भोगणें ॥
गुदीं मळविसर्ग ॥ ३ ॥

करांच्या योगानें देणें घेणें करणें, पायांनीं चालणें, शिश्नद्वारा रतिभोग करणें, आणि गुदद्वारानें मलविसर्जन करणें, (३)

या इंद्रियांतूनि तूंचि ज्ञान ॥
साक्षी प्रकाशसी आड ठाकोन ॥
तो तूं इंद्रियांसी विलक्षण ॥
साक्षिरूप ॥ ४ ॥

इत्यादि प्रकारच्या इंद्रियक्रियांना आड राहून प्रकाश देणारा तूंच असल्यानें या इंद्रियक्रियांना तूं विलक्षण साक्षिरूप आहेस. (४)

श्रवण स्पर्शन दर्शन ॥
आस्वादन अवग्रहण ॥
या ज्ञानेंद्रियेंकरून ॥
पांचही विषय ॥ ५ ॥

श्रवण, स्पर्शन, दर्शन, आस्वादन आणि अवग्रहण या पंचज्ञानेंद्रियेंकरून सर्व विषय पांच प्रकारचे आहेत. (५) ह्मणजे–

शब्द स्पर्श रूप रस गंध ॥
वचनादान गमनानंद ॥
मळविसर्ग हे पंचविध ॥
कर्मेंद्रियां जाणता तूं ॥ ६ ॥

शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध या पांच विषयांत सर्व विषयांचा समावेश होतो. आणि वचन, घेणें, गमन, आनंद आणि मलविसर्ग हीं कर्मेंद्रियें ह्मणजे विषयांसह पंचज्ञानेंद्रियें आणि क्रियेसह पंचकर्मेंद्रियें यांचा जाणता तूं आहेस. (६)

प्राणाऽपान व्यान ॥
उदान आणि समान ॥
यांचीं स्थानें स्थिति संपूर्ण ॥
जाणसी तूंचि एक ॥ ७ ॥

त्याचप्रमाणें प्राण, अपान, व्यान, उदान आणि समान या पांच प्रकारच्या वायूंचीं स्थानें आणि स्थिति यांचाही जाणता तूंच आहेस. (७)

अंतःकरण मन बुद्धि ॥
चित्त अहंकार या पांचां भेदीं ॥
स्फुरसी जाणसी तूं आदीं ॥
ठायींचाचि उभा ॥ ८ ॥

त्याचप्रमाणें अंतःकरण, मन, बुद्धि, चित्त आणि अहंकार या पांच भेदांनीं स्फुरण करणारा व जाणणारा जो, तो तूं आधींपासूनच ह्मणजे जसा कांहीं स्वयंभूच उभा आहेस. (८)

अंतःकरणींचा आठव सपूर ॥
वरी उठती वृत्तीचे उद्गार ॥
तयांसी जाणे तो अक्षर ॥
सिद्धचि असे ॥ ९ ॥

त्या तुला, अंतःकरणांतल्या अतिसूक्ष्म आठवणीनें उठणाऱ्या वृत्तींच्या उद्गारांना जाणणारा, ह्मणून, अक्षर सिद्ध पुरुष ह्मणतात. (९)

वृत्तीचें स्फुरण झालें ॥
तयामागूनि जाणणें उठिलें ॥
हें ह्मणों नये पहिलें ॥
आइतेंचि असे ॥ १० ॥

अंतःकरणांत वृत्तीचें स्फुरण झाल्यावर जाणणें ह्मणजे ज्ञानाचा व्यापार सुरू होतो ह्मणून अंतःकरणाला पहिलें ह्मणण्याचें कारण नाहीं. कारण तें आयतेंच ह्मणजे स्वतःसिद्ध आहे. ( १० )

अंतःकरणवृत्तीचें स्फुरण ॥
तें संकल्पविकल्पात्मक मन ॥

तें अंतःकरणवृत्तीचें स्फुरण आहे तेंच संकल्पविकल्पात्मक झालें ह्मणजे

| | |
|---|---|
| तेंचि निश्चयात्मक ह्मणोन ॥<br>बुद्धि ह्मणिजे ॥ ११ ॥ | मन होतें, आणि निश्चयात्मक झालें कीं त्याच अंतःकरणाला बुद्धि ह्मणतात. (११) त्या बुद्धीचा— |
| निश्चयात्मक जो अर्थु ॥<br>तेथें अनुसंधानात्मक हेतु ॥<br>तें चित्त हें जाण तूं ॥<br>तत्प्रवृत्ति तो अहंकारू ॥१२॥ | निश्चयात्मक प्रकार झाला ह्मणजे त्यांत अनुसंधानात्मक हेतु ह्मणजे कांहीं तरी वस्तूवर मन गुंतून रहाणें, असा प्रकार होतो, त्याला चित्त ह्मणतात. आणि त्या चित्ताची जी प्रवृत्ति, तिला अहंकार ह्मणतात. (१२) |
| ऐसी अंतःकरणपंचकस्फूर्ति ॥<br>तूंचि जाणसी स्वयंज्योती ॥<br>यालागीं स्वसंवेद्य मूर्ति ॥<br>आत्मा तूंचि ॥ १३ ॥ | अशा प्रकारच्या ह्या अंतःकरणपंचकस्फूर्तीला स्वयंज्योत असल्यानें तूं जाणतोस, यास्तव स्वसंवेद्य आत्म्याची मूर्ति तूं आहेस. (१३)—असें पहा, कीं- |
| जैसा कापुसापासूनि निघे दोरा<br>तोचि तया भास दुसरा ॥<br>तैसें मन बुद्धि चित्त अहंकारा ॥<br>होणें स्वरूपापासूनि ॥ १४ ॥ | कापसापासून दोरा निघाला, ह्मणजे कापूसपणाचा भास जाऊन त्याच्या ठिकाणीं दोरेपणाचा निराळा भास उत्पन्न होतो, तद्वतच मन, बुद्धि, चित्त आणि अहंकार यांपैकीं प्रत्येक स्वरूपापासून होणारा निराळा भास आहे. (१४) तो कसा तो पहाः— |
| तो पीळ नुकलितां दोरा ॥<br>ह्मणावा परी कापूस खरा ॥<br>उकलितां नुकलितां दुसरा ॥<br>भाग नाहीं ॥ १५ ॥ | दोऱ्याचा पीळ उकलला नाहीं तोंपर्यंत त्याला दोरा ह्मणावें, परंतु त्याचा पीळ उकलला काय आणि न उकलला काय त्यांत कापसावांचून दुसरा प्रकार नाहीं असें खरें कीं नाहीं? (१५) |
| ना तरी उदकाचा तरंग ॥<br>तेथें दुसरा नाहीं भाग ॥<br>तो विरालिया चांग ॥<br>उदक उदकीं ॥ १६ ॥ | अथवा उदकावर तरंग आला ह्मणून त्याला तरंगांत पाण्यावांचून दुसरा कांहीं भाग उत्पन्न होत नाहीं. परंतु तो तरंग विरून गेला ह्मणजे उदकच उदकामध्यें विरून जातें. (१६) |

पंरि जळावांचोनि कांहीं ॥
आणिक विजातीय नाहीं ॥
तैसें मन माघारें आत्मयाचे ठायीं
तंव तें नाहींच होय ॥ १७ ॥

परंतु त्यांत जळावांचून जसा दुसरा प्रकार नसतो, त्याचप्रमाणें मनानें माघार घेऊन आत्मस्वरूपीं बुडी दिली, कीं मनच अजिवात तरंगाप्रमाणें नाहींसें होतें आणि आत्मरूप बनतें. (१७)

तो तरंग का दोरा ॥
उठवी पीळ आणि वारा ॥
तैसा हा लिंगदेहाचा उभारा ॥
कारणमाया करी ॥ १८ ॥

दोऱ्याला कारण पीळ आणि तरंगाला कारण वारा, त्याचप्रमाणें लिंगदेहाला कारण माया अर्थात् मायेच्या योगानें लिंगदेहाची उभारणी होते. (१८)

उकललिया का सुरालिया ॥
पीळ वारा जाय लया ॥
तैसी आत्मज्ञानें कारणमाया ॥
मिथ्या होय ॥ १९ ॥

उकलल्यावर पीळ आणि सुरल्यावर वारा जसा नाहींसा होतो, तद्वत् आत्मज्ञान प्राप्त होण्यावरोबर कारणमायाच मिथ्या होते, अथवा मायाकारणच नाहींसें होतें. (१९)

तरंग जळ दोरा कापूस ॥
ऐक्य होतां जाय दुजा भास ॥
तैसें होय मन स्वरूपीं समरस ॥
तेथें अज्ञान हारपे ॥ २० ॥

तरंग आणि जळ, अथवा दोरा आणि कापूस यांचें ऐक्य होण्यावरोवर जसा दुजा भास नाहींसा होतो, त्याचप्रमाणें मनाचें स्वरूपासीं समरसत्व होतांच अज्ञान हारपून जातें. (२०)

असो हे स्फूर्तिकल्पना ॥
बोलिजे लिंगदेह अंतःकरणा ॥
तेथें स्वप्नावस्था जाणा ॥
वासनामय ॥ २१ ॥

अशा या स्फूर्तिकल्पनेच्या योगानें अंतःकरणाला लिंगदेह असें ह्मणतात. ह्या लिंगदेहाचें स्वरूप वासनामय असून स्थिति स्वप्नावस्था आहे. (२१)

मन प्रवर्ते इंद्रियद्वारें ॥
ते वासना अभ्यंतरीं विवरे ॥
तैं स्वप्नावस्था मांडे बा रे ॥
श्रुत दृष्ट आभास ॥ २२ ॥

स्वप्नावस्थेंत उघडच आहे, कीं मनाची प्रवृत्ति इंद्रियद्वारानें असल्याकारणानें तें मन वासनारूपानें अभ्यंतरांत ह्मणजे अंतःकरणांत शिरतें, तेव्हां स्वप्नावस्थेचा खेळ सुरू होतो. त्या खेळांत ऐकलेल्या च पाहिलेल्या सर्व गोष्टी भासरूपानें पुढें येत असतात. (२२)

तैजस अभिमानी दृश्य ॥
या इतुकिया ओळखीस ॥
असे अंतःकरणीं चिदाभास ॥
व्यापक तो ॥ २३ ॥

तेव्हां अर्थांतच या कारणांवरून अं-तःकरणरूपी लिंगदेहाचा तैजस अभिमान दृश्य होतो. तथापि अतःकरणांत चिद्रूप प्रकाश आहे, आणि तो तर सर्वव्यापक आहे. (२३)

जैसा आदित्य लोहीं पडे अग्नी ॥
तो नव्हे काय दिनमणी ॥
तैसा बिंबला जो अंतःकरणीं ॥
तो स्वयंप्रकाश ॥ २४ ॥

लोहाराच्या आंगणांतील आगीच्या भट्टींत सूर्यप्रकाश पडला येवढ्या कारणा-वरून सूर्याचें दिनमणित्व जात नाहीं त्याचप्रमाणें अंतःकरणांत बिंबल्याकारणानें आत्म्याचें स्वयंप्रकाशत्व नाहींसें होत नाहीं. (२४)

यांत तुझी एक जाणीव नाहीं ॥
तरी हे इत्यादिक न स्फुरे कांहीं ॥
यालागीं चिदाभासें आभास पाहीं ॥ भासविला ॥ २५ ॥

परंतु गंमत होते आहे ती अशी कीं, एक जाणीव शक्ति नसल्याकारणानें हें स्फुरण कसें होतें, तें तुला कळत नाहीं, ह्मणून चित्प्रकाशाचा तुझ्याठायीं आभास आहे असा प्रकार तुला भा-सला ह्मणजे चित्प्रकाशाची कल्पना तुझ्या मनांत प्रज्वलित झाली नसल्याका-रणानें अंतःकरणच मी आहें असें घेऊन तूं बसलास. (२५)

तुझी एक जाणीव खंडे ॥
तरी कांहीं न पुढें मांडे ॥
तेथें तुचांचि उरिजे अखंडें ॥
स्वस्वरूपें ॥ २६ ॥

यांत तुझी एक जाणीव नाहींशी होऊं दे, ह्मणजे मग तुझ्यापुढें कांहीं दिसतें का पहा. त्या वेळीं तुझ्यापुढें काहींएक न येतां अखंडित स्वस्वरूपानें तुझा तूंच एक असशील. (२६)

तूंचि स्फुरसी बोलशी ऐकशी ॥
अंतरींचें अंतर जाणसी ॥
तूंचि पाहें तुजशीं ॥
विचारूनियां ॥ २७ ॥

अशा स्थितीचा विचार करून पहा ह्मणजे तुला असें वाटेल, कीं स्फुरण तुझेंच आहे, बोलणें तुझेंच आहे, ऐ-कणें तुझेंच आहे, अंतरांतले अंतरांत जाणणारा तूंच आहेस, आणि तुझा तूंच पहाणारा आहेस. (२७)

जयाचेनि प्रकाशें ॥
अंतःकरण प्रकाशे ॥
जो निजतेजें स्फुरतसे ॥
तो जाण पां तूंचि ॥ २८ ॥

म्हणजे ज्याच्या प्रकाशानें अंतःकरण प्रकाशित होतें, व ज्याच्या निजतेजानें स्फुरण होतें, तो तूंच आहेस, समजलास का? (२८)

तेंचि जाणीव धरूनि उल्हासे ॥
तरी नसतेंचि दृश्य भासे ॥
तें तें जाणीव निरसे ॥
तैं आत्मा लाभे ॥२९॥

परंतु होतें आहे काय, कीं जाणतेपणाची ऐट मारली, कीं नसतेंच पुढें येऊन दत्त उभें रहातें. परंतु त्याच जाणतेपणाचा निरास होण्यावरोबर आत्मस्वरूपाचा लाभ होतो. (२९)

जाणिवेचिये वेळे ॥
जें तियेपुढें आभासलें ॥
तें दृश्य म्हणोनि त्यजिलें ॥
तेथें तेंचि उरे ॥ ३० ॥

म्हणून जाणतेपणाचा अभिमान धरल्यानें जें कांहीं पुढें दिसत असतें, तें दृश्य असें समजून त्याचा त्याग करतांच उरतें तें आत्मस्वरूप असतें. (३०)

जें जें भासे जाणिविये ॥
तें तें जरी निरसूनि जाये ॥
तरी जाणीवचि आहे ॥
तेचि पाहे तियेतें ॥ ३१ ॥

म्हणून जें जें जाणिवेला भासत असतें, त्याचा त्याचा निरास करित गेलें असतां जाणीव मात्र उरते, आणि जाणीवच जाणिवेला पाहूं लागते. (३१)

ते जाणीव आत्मयाची प्रभा ॥
तो स्वयंभू तियेतें उभा ॥
दीप आपुलिया शोभा ॥
आपण जैसा ॥ ३२ ॥

तीच जाणीव आत्म्याची प्रभा असून त्या प्रभेंतच स्वयंभू आत्मा उभा असतो याला दृष्टांत दीप आणि प्रभा. दीप आहे तोंपर्यंतच प्रभा आहे, म्हणून प्रभेंत दीपत्व स्वयंभू उभेंच आहे. (३२)

दृश्य मृगजळ आभासन ॥
तें करूनियां निरसन ॥
तूं पाहें बा कवण ॥
आपण ऐसें ॥ ३३ ॥

म्हणून कर काय, कीं माया अविद्येच्या योगानें जाणिवेला जें कांहीं दृश्य मृगजलवत् भासत असतें, त्याचा निरास करून तूं कोण आहेस हें पहा. (३३)

इति श्रीपरमामृते मुकुंदराजविरचिते लिंगदेहनिरसनं नाम पंचमप्रकरणं संपूर्णम् ॥ २ ॥

# प्रकरण ६ वें.

## कारणदेहनिरसन.

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीगुरुभ्यो नमः ॥

नेणें ह्मणसी तें नेणिव ॥
तो मिथ्या भ्रमभाव ॥
रूपासारिखे अवयव ॥
छायेस जैसे ॥ १ ॥

नेणें ह्मणून जें ह्मणतोस त्याचेंच नांव नेणिव ह्मणजे अज्ञान असें आहे. परंतु अज्ञान आहे असें ह्मणणें हाच आधीं खोटा भ्रम आहे. कारण रूपासारखेच अवयव छायेला असतात, तथापि छाया हा रूपाचा मिथ्या भास आहे. (१)

आप आपणिया जाणता ॥
सदैव असे सर्वथा ॥
नातरी न कळण्याची अवस्था ॥
कवण सांगे ॥ २ ॥

तर मग सर्वकाळ आणि सर्व प्रकारनें आपण आपल्याला जाणतों असें होतें. तर कळत नाहीं अशी अवस्था आहे असें सांगणारा तरी कोण आहे? (२)

आप आपणा जाणता निकें ॥
तेथें नेणिव आड ठाके ॥
तरी इयेचें पारखें- ॥
पण कवण सांगे ॥ ३ ॥

ह्मणजे आपण आपल्याला बरोबर जाणत असतां मध्येंच आड जें नेणिव अर्थात् अज्ञान येत असतें, त्याचें पारखेपण ह्मणजे निराळेपण कोण सांगतो? (३)

न कळे ऐसें जाणवलें ॥
तें न कळण्यासि नाहीं कळलें ॥
ह्मणोनि नेणणें जया विवळे ॥
तोचि जाण आत्मा ॥ ४ ॥

या प्रश्नाला उत्तर. "न कळे" ह्मणजे समजत नाहीं असें जें जाणतां आलें ह्मणजे समजलें, तें कांहीं "न कळण्यासी" ह्मणजे अज्ञानाला कळलें नाहीं. ह्मणून नेणणें अर्थात् अज्ञान ज्याला कळलें, तोच आत्मा आहे. (४)

आपुलिया जाणिवा ॥
धरिशी नेणिवभावा ॥
या कारणें तो गोंवा ॥
पडे जयाचा तयासी ॥ ५ ॥

परंतु झालें आहे काय, कीं, आत्म्यानें आपला जाणिवभाव सोडून नेणिवभाव धरला असल्याकारणानें त्याचा त्यालाच गोंधळ पडून जातो! (५)

आप आपणिया न कळे हें नेणिव
ऐसें ह्मणावें तरी तोचि जाणिव-
भाव ॥ ह्मणोनियां नेणिव ॥
मिथ्या भ्रांती ॥ ६ ॥

हा गोंधळ मोठा मासलेदार आहे. आपलें आपल्याला कळत नाहीं ह्मणून त्याला अज्ञान ह्मणावयाचें परंतु अज्ञान कळल्याबरोबर नेणिवभाव जाऊन त्या ठिकाणीं जाणिवभाव होतो. तेव्हां अर्थात-च नेणिव ह्मणजे अज्ञान हा मिथ्या किंवा खोटा भास ठरतो. (६)

नेणिव जरी जाणितली ॥
तरी नेणिव मिथ्या झाली ॥
तेथें जाणिव उरली ॥
आत्मप्रभा ॥ ७ ॥

ह्मणजे नेणिव जाणली कीं नेणिव मिथ्या ठरलीच. ह्मणून नेणिव जाऊन जी जाणिव उरते, तिचेंच नांव आत्म-प्रभा. (७)

तूंचि आपणा नेणसी ॥
ऐसें तूंचि जाणशी ॥
तरी नेणिवे कां गुंतसी ॥
नाथिलाचि ॥ ८ ॥

तर मग तूंच आपलें आपल्याला कळत नाहीं असें जर जाणतोस तर विना-कारण नेणिवेच्या वर्गांत तूंच आपल्याला गोवून नाहीं का घेत ? (८)

तूं आत्मा स्वयंप्रकाश ॥
तेथें नेणिव हा मिथ्या भास ॥
तो निरसता तूं अविनाश ॥
स्वतःसिद्ध ॥ ९ ॥

आणि तूं तर स्वयंप्रकाश आत्मा आ-हेस, आणि झालें आहे काय, कीं तुझ्या ठिकाणीं नेणिवेचा मिथ्या भ्रम झाला आहे, परंतु त्याचा निरास होण्याबरो-बर तूं स्वतःसिद्ध अविनाशस्वरूपच आहेस. (९)

या सर्वांसी जो जाणे ॥
तो काय आपणातें नेणे ॥
नेणिवेस तरी कळणें ॥
असेचिना ॥ १० ॥

असें पहा, कीं जो या सर्वांला जा-णतो तो आपण आपल्याला जाणत नाहीं असें ह्मणतां तरी येईल कसें ? परंतु नेणिव जें आहे, त्याच्या ठिकाणीं जाणिव असत नाहीं ही गोष्ट मात्र खरी आहे. (१०)

ऐसें नेणिव तेंचि कारण ॥
कार्य स्थूल सूक्ष्म जाण ॥

ह्मणून जें नेणिव तेंच अज्ञानाचें का-रण असून स्थूल आणि सूक्ष्म हीं त्याचीं

तियेकारण सुषुप्तीचें लक्षण ॥
ऐक आतां ॥ ११ ॥

कार्यें आहेत. त्या अज्ञानाची अवस्था सुषुप्ति आहे, ह्मणून सुषुप्तीचें लक्षण आतां सांगतों. (११)

मन प्रवर्ते इंद्रियद्वारें ॥
बाह्य विषयीं वावरे ॥
ते जागृती हें खरें ॥
जाणिजेसु ॥ १२ ॥

मनाची प्रवृत्ति इंद्रियद्वारानें असून तें बाह्य विषयामध्यें वावरत असतें, त्या वेळीं जागृती असते. (१२)

तो आभास घेऊनि अंतरीं ॥
मन सूक्ष्म कल्पना करी ॥
तेथवां स्वप्नावस्था वरी ॥
मांडे तेथें ॥ १३ ॥

त्या वावरण्याचा अंतःकरणांत ध्यास घेऊन मन सूक्ष्म कल्पना करण्यांत ज्या वेळीं गुंततें, त्या वेळीं त्या अवस्थेंत स्वप्नाचा बाजार मांडत असतो. (१३)

परि जाणिव दोहींची एक ॥
ते आपणिया करी निःशेख ॥
तेव्हां सुषुप्ति अवस्था देख ॥
अज्ञान गडद ॥ १४ ॥

या दोन्ही अवस्थांची जाणिवशक्ति एकच असते. ती जाणिवशक्ति ज्या वेळीं निःशेष ह्मणजे जाणपणा सोडून असते, त्या वेळीं त्या अवस्थेचें नांव सुषुप्ति (निद्रा) ह्मणजे घनघोर अज्ञान असतें. (१४)

तें नेणिवचि आहे जाणिव ॥
परी धरिला विपरीत भाव ॥
आप आपणा नाठव ॥
अज्ञानवशें ॥ १५ ॥

या सुषुप्ति अवस्थेमध्यें जें नेणिव ह्मणून असतें, तेंच वास्तविक जाणिव आहे परंतु अज्ञानवश झाल्याकारणानें विपरीत भाव धरून आपण कोण हें विसरून गेली आहे ! (१५)

आप आपणा विसरली ॥
मग प्रपंचाचा भास कल्पूं लागली ॥ मी जीव हीच भुली ॥
सुषुप्तीसी ॥ १६ ॥

आपण कोण हें विसरून गेल्याकारणानें मीच जीव अशी जाणिवेला सुषुप्तींत भूल पडून ती प्रपंचामध्यें रंगून गेली ! (१६)

तें नेणिव जैं फिटे ॥
तैं स्वयंभरूप उमटे ॥

ह्मणून या नेणिवरूप सुषुप्तीचा ज्या वेळीं निरास होईल, त्याच वेळीं किडाळ

जैसें किडाळ जळालिया पुढें ॥
शुद्ध राहे ॥ १७ ॥

ह्मणजे हिणकटपणा जळून गेल्यावर सोनें जसें शुद्ध होतें, त्याप्रमाणें आपलें स्वयंभूरूप प्रकट होईल. (१७)

नेणिवेपासाव उगवता ॥
अभिमान होय धरिता ॥
तो प्राज्ञ हे व्यवस्था ॥
कारणदेहाची ॥ १८ ॥

नेणिवेपासून कारणदेहाची उत्पत्ति असल्याकारणानें त्या कारणदेहाच्या अभिमानाला प्राज्ञ अवस्था असें ह्मणतात. (१८)

इति श्रीपरमामृते मुकुंदराजविरचिते कारणदेहनिरसनं नाम षष्ठप्रकरणं संपूर्णम् ॥ ६ ॥

---

## प्रकरण ७ वें.

## महाकारणदेहनिरसन.

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीगुरुभ्यो नमः ॥

हा अवघा दृश्याकार ॥
भासे जाणिवेसमोर ॥
तो निरसूनि तूंचि उर ॥
ज्ञानस्वरूप ॥ १ ॥

जाणिवेसमोर जो दृश्याकार भासतो त्याचा निरास कर, आणि कर काय, कीं ज्ञानस्वरूप असा तूंच ऊर. (१)
कारण—

नेणिवेच्या नेणिवभावा ॥
तूंचि जाणसी स्वयमेवा ॥
ते जाणिव धरूनि आपुलिया
खेवा ॥ आपण रिघावें ॥२॥

नेणिवेचा जो नेणिवभाव आहे, त्याचा जाणता स्वयमेव तूच आहेस, ह्मणून तें जाणिव धरून तूं आपल्या ठिकाणीं भेटीला जा. (२)

आप आपणासीं जाणतां ॥
नेणिव आहे कीं आतां ॥
स्वयेंचि होऊनि ज्ञाता ॥
निरसी नेणिव ॥ ३ ॥

ह्मणजे आपणच आपल्याला जाणल्यावर नेणिव न रहातां आपणच ज्ञाता होऊन नेणिवेचा निरास होईल. (३)

नेणिव जेथें निरसली ॥
तेथें जाणिव राहिली ॥
ते निजदृष्टी बोलिली ॥
आत्मरूप ॥ ४ ॥

मग अर्थातच नेणिवेचा निरास झाला, ह्मणजे फक्त काय ती जाणिव एकटी राहिली. त्याच जाणिवेला निजदृष्टी ह्मणतात. आणि ती निजदृष्टी तेंच आत्मस्वरूप. (४)

जो आपुलिया जाणिवा ॥
जाणे प्रपंचा सर्वा ॥
तया आपणा जाणावया गोवा ॥
पडे नेणिवेचा ॥ ५ ॥

परंतु जो आपल्या जाणिवेच्या योगानें सर्व प्रपंचाला (जगताला) जाणतो, त्यालाच आपल्या स्वतःला जाणायाला नेणिवेचा गोवा पडतो ! (५)

ते नेणिव फिटे गुरुखुणा ॥
जाणे आपण आपणा ॥
बोलिजे या अनुसंधाना ॥
महाकारण ऐसें ॥ ६ ॥

असें जें नेणिव त्याचा गुरुखुणेनें अर्थात् प्रसादानें निरास झाल्यावर आपलें आपल्याला जाणण्याचें जें अनुसंधान लागतें, त्याला महाकारण असें ह्मणतात. (६)

फिटूनियां नेणणें ॥
आप आपणा जाणणें ॥
तिहीं देहांचेनि साक्षिपणें ॥
महाकारणदेह ॥ ७ ॥

नेणण्याचा निरास होऊन आपण आपल्याला जाणूं लागून तिहीं देहांत ह्मणजे स्थूल, सूक्ष्म आणि कारण या तिहीं देहांत साक्षित्वानें असणें ही खूण महाकारणदेहाची. (७)

तिहीं अवस्थांचें जाणपण ॥
तियेसि तुर्या अवस्था ऐसी खूण ॥
तिहीं देहांचें जें अवलोकन ॥
तें महाकारणदेह ॥ ८ ॥

आणि या तिन्ही देहांच्या अवस्थांना जाणणाऱ्या स्थितीला तुर्यावस्था अशी खूण आहे. ह्मणून या तिहीं देहांचें अवलोकन तेंच महाकारणदेहाचें लक्षण होय. (८)

मी सर्वसाक्षी आपण ॥
हा प्रत्यगात्म्याचा अभिमान ॥
सर्वांचें जेथें खुंटलें स्फुरण ॥
तें शुद्ध स्वरूप ॥ ९ ॥

या देहलक्षणांत सर्वसाक्षित्व असल्यानें याचा अभिमान प्रत्यगात्मा असा आहे. परंतु हें शुद्ध स्वरूप नव्हे. कारण शुद्ध स्वरूपांत स्फुरण थांबावें लागतें. (९)

कार्य कारणाचें कारण ॥
यालागीं बोलिजे महाकारण ॥
कार्य कारण झालिया शून्य ॥
महाकारण कवण ह्मणे ॥ १० ॥

कार्य हें कारणाचें कारण आहे ह्मणून याला महाकारण असें ह्मणतात. ह्मणून कार्यकारणच शून्य झालें, तर मग त्याला महाकारण तरी कोण ह्मणेल ? (१०)

आहे स्वयंभ आपण ॥
जाणे आपली आपण खूण ॥
परब्रह्म निर्वाण ॥
निजस्वरूप ॥ ११ ॥

हा स्वयंभू आपला आपणच असल्या-कारणानें परब्रह्म निर्वाणनिजस्वरूपाची आपली आपणच खूण जाणतो. (११)

ऐसें आपुलें अनुसंधान ॥
करितां होय विज्ञान ॥
प्रपंचाचें मिथ्यापण ॥
प्रत्यया ये ॥ १२ ॥

ह्मणून अशा प्रकारचें आपलें अनुसंधान ह्मणजे आपणच आपल्याला जाणण्याचा व्यासंग लागला, ह्मणजे अनुभवज्ञान होऊन प्रपंचाचें मिथ्यापण प्रत्ययाला येऊं लागतें. (१२)

मी शुद्धात्मा आपण ॥
ऐसा वर्ते जो अभिमान ॥
तयाचाही साक्षी कवण ॥
तुजवांचोनि ॥ १३ ॥

त्या वेळीं मी शुद्धात्मा आहें असा जो अभिमान वर्तत असतो, त्या अभिमानाचा साक्षी तुजवांचून दुसरा कोण आहे ? (१३)

ह्मणोन जाणिवेचें जें निजज्ञान॥
तें शुद्धस्वरूप आपण ॥
सर्व निरसीं परिपूर्ण ॥
निजात्मा तूं ॥ १४ ॥

ह्मणून जाणिवेचें जें निजज्ञान; त्यानें सर्वांचा परिपूर्ण निरास केल्यावर तुझा तूंच शुद्धस्वरूपाचा निजात्मा आहेस. (१४)

ज्ञान जेथुनि स्फुरावें ॥
तें आपणचि स्वभावें ॥
ऐसें स्वरूप अनुभवावें ॥
जाण पैं गा ॥ १५ ॥

ज्ञान हें ज्या ठिकाणांतून स्फुरण पावतें तें स्वाभाविकपणें आपणच आहोंत, अशा प्रकारचा स्वरूपानुभव घेणें हें जाणलें पाहिजे. (१५)

जेथें जाणीव खुंटे ॥
तें तुझें स्वरूप नेटें बोटें ॥

आणि ज्या ठिकाणीं जाणणें थांबतें ह्मणजे याच्या पुढें काय आहे याची ज्ञानाला कल्पना होत नाहीं, तेंच तुझें

घनानंद चढे ना वोहटे ॥
अपरिमित ॥ १६ ॥

खरें खरें अथवा बोटानें दाखविण्यासारखें स्वरूप होय. त्या स्वरूपाच्या ठिकाणीं आनंद इतका कांहीं मावलेला आहे, कीं त्याला ओहटी तर कधीं लागतच नाहीं, परंतु भरतीलाही स्थळ नाहीं. इतका तो परमावधीचा आहे. (१६)

जें अमर्याद अमूप ॥
तें जाणिजे आपेआप ॥
अविनाश स्वरूप ॥
अखंडित ॥ १७ ॥

ह्मणून जें अमर्याद आणि अमूप व अखंड आणि अविनाश असें स्वरूप आहे, तें आपोआप जाणतां आलें पाहिजे. (१७)

**इति श्रीपरमामृते मुकुंदराजविरचिते महाकारणदेहनिरसनं नाम सप्तमप्रकरणं संपूर्णम् ॥ ७ ॥**

---

## प्रकरण ८ वें.

## शून्यखंडण.

**श्रीगणेशाय नमः ॥ श्रीसरस्वत्यै नमः ॥ श्रीगुरुभ्यो नमः ॥**

जरी तें शून्य भाविजे ॥
तरी कल्पुनि नांव ठेविजे ॥
जें आपणा आपण बुझे ॥
तें शून्य कैसें ॥ १ ॥

ज्या ठिकाणीं ज्ञानाची अक्कल चालत नाहीं असें जें घनानंद अपरिमित स्वरूप तें शून्यभाव जरी भासतें, तथापि कल्पनेनें कांहीं तरी त्याला नांव ठेविलें पाहिजे. कां कीं, जें आपण आपल्याला जाणतें त्याला शून्य कसें ह्मणावें ? (१)

जो सर्व शून्यातें जाणे ॥
तया शून्य ऐसें कवण ह्मणे ॥

आणि जो सर्व शून्याला जाणतो, त्याला शून्य ह्मणायाला तयार तरी कोणीं व्हावें ? कारण जें कांहीं नाहीं तें आपल्याला जाणणार कसें ? व जाणतें तर

जें कांहीं नाहीं तेणें ॥
आपणा केविं जाणिजे ॥ २ ॥

त्याला शून्य ह्मणतां आलें असतें; परंतु जें कांहीं नाहीं असें भासतें, तें तर आपण आपल्याला जाणतें, ह्मणून त्याला शून्य ह्मणवतच नाहीं. (२)

यया स्वरूपीं नुरे दृश्य ॥
दृश्यासि द्रष्टृत्व अदृश्य ॥
जयाचे तयासीच प्रकाश ॥
स्वस्वरूप सदा ॥ ३ ॥

त्याच्या स्वरूपापुढें दृश्य असें कांहींच उरत नाहीं आणि द्रष्ट्यापुढें दृश्य अदृश्यच होऊन जातें. कारण ज्याचा त्याच्याच जवळ सर्वदा स्वरूपाचा प्रकाश असतो. (३)

सर्वही निरसूनि जाणिव ॥
उरलें सांडून नेणिव ॥
तया ज्ञाना जाणावया भाव ॥
न स्फुरे कांहीं ॥ ४ ॥

ह्मणून सर्वांचा निरास केल्यावर नेणिवेला सोडून एक जाणिव उरलें ह्मणजे त्या जाणिवरूप ज्ञानाला जाणायाला दुसरा असा स्फुरणभाव कोणताच रहात नाहीं. (४)

ह्मणोनि अभाव ऐसा भासे ॥
परी शून्य ह्मणावें कैसें ॥
जें सर्वांसी जाणोनि असे ॥
शून्यासमवेत ॥ ५ ॥

या कारणानें स्वरूपाच्या ठिकाणीं अभाव असा भास होतो, परंतु त्याला शून्य ह्मणतां येत नाहीं. कारण तें सर्वांना जाणून शून्यासमवेत असतें. (५)

शून्यातें शून्यपण ॥
जाणिव कल्पी आपण ॥
तें स्वरूपीं होय लीन ॥
शून्यासहित ॥ ६ ॥

शून्याचें शून्यपण जाणिव आपल्याच ठिकाणीं कल्पून तें स्वरूपाच्या ठायीं शून्यासहित लीन होऊन जातें. (६)

तें शून्य ना जाणिव ॥
दृश्य ना नेणिव ॥
ज्ञप्तिमात्र भरींव ॥
स्वस्वरूप ॥ ७ ॥

या स्वरूपाची ओळख ह्मणजे तें शून्य नाहीं आणि जाणिवही नाहीं, तसेंच दृश्य नाहीं व नेणिवही नाहीं, परंतु ज्ञप्तिमात्र स्वस्वरूपानें सर्वत्र भरलेलें आहे. (७)

जें निरंतर निर्मळ ॥<br>
ज्ञानघन केवळ ॥<br>
चिदाकाश अखिल ॥<br>
अगोचर ॥ ८ ॥

तें असें, कीं निरंतर निर्मळ असून ज्ञानानें भरलेलें आणि सर्वत्र प्रकाशित असून अगोचर आहे. (८)

जेथें शून्य दृश्याकार ॥<br>
अज्ञान निरसूनि अनिवार ॥<br>
जें सूक्ष्माहूनि सूक्ष्म सपूर ॥<br>
निजज्ञान ॥ ९ ॥

आणि अनिवार अज्ञानाचा नाश करीत असल्यानें हें शून्य तथापि (शक्तिरूपानें) दृश्याकार आहे, आणि सूक्ष्माहूनही अतिसूक्ष्म असें सपूर हें निजज्ञान आहे. (९)

जें निष्कलंक ज्ञानाकाश ॥<br>
करी शून्याकाशाचा ग्रास ॥<br>
तो निजद्रष्टा स्वयंप्रकाश ॥<br>
परमात्मा तूं ॥ १० ॥

निष्कलंक ज्ञानाकाश असून शून्याकाशाचा ग्रास करणारें आहे असें जें स्वरूप स्वयंप्रकाश त्याचा निजद्रष्टा परमात्मा तो तूंच आहेस. (१०)

तो तूं निरालंब साक्षी ॥<br>
निर्लेप सर्वपक्षीं ॥<br>
पारावाररहित निरीक्षीं ॥<br>
देखणा तूं होउनी ॥ ११ ॥

असा जो तूं, तो तूं स्वतंत्र असून साक्षिरूप आहेस, आणि सर्वपक्षीं दोषरहित आहेस, आणि अंतरहित असून पहाणारा असा तूं आहेस. (११)

जें ज्ञानाचें जिव्हार ॥<br>
आस्तिकांचें घर ॥<br>
सुखाचें सागर ॥<br>
घनानंद तूं ॥ १२ ॥

आणि तूं ज्ञानाचें जिव्हार असून आस्तिक बुद्धीचें घर आहेस, आणि आनंदघन असल्याकारणानें तूं केवळ सुखसागरच आहेस. (१२)

जें सर्वसाक्षीचें दीपन ॥<br>
जें प्रकाशाचें कोंदण ॥<br>
जें आत्मानंदाचें निधान ॥<br>
तें कैवल्य तूं ॥ १३ ॥

आणि सर्वसाक्षीचें दीपन, प्रकाशाचें कोंदण आणि आत्मानंदाचें निधान जें कैवल्य तें तूंच आहेस. (१३)

जें सकळ निरासें शुद्धबुद्ध ॥<br>
जेथें उुरे त्वंपद ॥

आणि सर्वांचा निरास करून अखेर जें शुद्ध ज्ञान रहातें, ज्या [illegible] त्वंपद

सरे तत्पद शुद्ध ॥
असिपदेंसीं ॥ १४ ॥

ह्मणजे मीपण जाऊन तत्पदाचाही शुद्ध असिपदांत शेवट अगर लय होतो. (१४)

ऐसा तूं परमात्मा ॥
परि तुझा त्वां हारविला महिमा
आतां मिळूनि राहिजे निजधामा
कैसिया परी ॥ १५ ॥

असा जो तूं शुद्धस्वरूपी परमात्मा, त्या त्वां आपला महिमा हारविला असल्याकारणानें निजधामांत ऐक्यरूपानें राहण्याकरतां–(१५)

तो लक्ष्यांश अनुवादणें ॥
परिसावा शुद्ध अंतःकरणें ॥
नित्य जैसें अभ्यासणें ॥
तैसें सांगूं ॥ १६ ॥

नित्य अभ्यासाच्या योगानें शुद्ध लक्ष्यांश कसा साधावा तो प्रकार आतां सांगतों, तो तूं शुद्ध अंतःकरणानें ऐक. (१६)

जेणें स्वरूपीं निश्चय बैसे ॥
शुद्ध परमात्मा प्रकाशे ॥
सदा चित्त रमोनि समरसे ॥
कैवल्यामाजी ॥ १७ ॥

मी आतां अभ्यासाची पद्धत अशी सांगतों, कीं जिच्या योगानें स्वरूपावर निश्चय बसून शुद्ध पमात्मरूप प्रकाशेल, आणि त्यांतच चित्त समरस होऊन कैवल्यांत रमून जाईल. (१७)

इति श्रीपरमामृते मुकुंदराजविरचिते शून्यखंडणं नाम अष्टमप्रकरणं संपूर्णम् ॥ ८ ॥



# प्रकरण ९ वें.

## अभ्यासयोग.

**श्रीगणेशाय नमः ॥ श्रीसरस्वत्यै नमः ॥ श्रीगुरुभ्यो नमः ॥**

तरी हें सांगितल्यापरी ॥
तें स्वरूप निर्धारीं ॥
मग ऐसाच अभ्यास करीं ॥
नित्यनेमेंसीं ॥ १ ॥

मागच्या प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें स्वस्वरूपाचा निर्धार करून नित्यनेमानें असाच अभ्यास कर. (१)

पाहिजे एकांत स्थान ॥
जेथें चंचळ न होय मन ॥
सकळ वृत्तींतें आवरून ॥
बैसावें तेथें ॥ २ ॥

नित्याभ्यासाला बसावयाचें स्थळ अशा प्रकारचें एकांत पहा, कीं ज्या ठिकाणीं सकळ वृत्ति आवरून धरल्या असतां मनाला चंचलता उत्पन्न होणार नाहीं. (२) कारण,—

करूनि विषयाची निवृत्ती ॥
चित्तासी प्रत्यगावृत्ती ॥
धरीं दृश्यमात्रीं विरक्ती ॥
त्यागबुद्धी ॥ ३ ॥

मन हें चंचल आहे ह्मणून काय करावें, कीं विषयाचीच प्रथमतः निवृत्ति करून चित्ताची अंतर्मुख प्रवृत्ति करावी. ही चित्ताची अंतर्मुख प्रवृत्ति करण्याकरितां दृश्यमात्र ह्मणून जेवढ्या वस्तु आहेत तेवढ्यांविषयीं त्यागबुद्धीनें विरक्ति धरावी; (३)

बैसोनि आसनीं सावकाशें ॥
अंतरामाजी प्रवेशे ॥
एकवटी इंद्रियद्वारीं बैसे ॥
मनोवृत्ति जे ॥ ४ ॥

आणि मग विरक्तियुक्त आसनावर सावकाशपणानें बसावें, आणि अंतःकरणांत प्रवेश करावा व मनोवृत्ति एकत्र करून इंद्रियद्वारावर बसावें. (४) आणि

सांडून अभिमान स्थूळाचा ॥
भाव धरीं अंतराचा ॥
अभाव करूनि सर्वांचा ॥
गगन पाहीं ॥ ५ ॥

मग स्थूलदेहाभिमान सोडून अंतरीं भाव धरावा, आणि सर्वांचा अभाव करून गगनाकडे लक्ष द्यावें. (५)

स्थूळ इंद्रियांमधून ॥
युक्तीनें एकवटीं मन ॥
अंतराकाशीं नेऊन ॥
स्थिर करीं ॥ ६ ॥

पण स्थूळ इंद्रियांमधूनच युक्तीनें मन एकवट करावें, आणि अंतराकाशांत, अर्थात् अंतःकरणांत नेऊन स्थिर करावें.(६)

जे जे वृत्ती बाहेर धांवे ॥
तियेतें परतोनि आणावें ॥
येणें अभ्यासें स्थिरावे ॥
आपेंआप ॥ ७ ॥

असें करतांना जी जी मनोवृत्ति बाहेर धांव घेईल, तिला तिला परतून आणीत असावें. अशा प्रकारें नित्याभ्यास चालू ठेवला असतां मनोवृत्ति आपोआपच स्थिरावतील. (७)

नातरी जिकडे मनाची राहाटी
लागावें ना तयाचे पाठीं ॥
माघारी घालोनियां दृष्टी ॥
स्वस्वरूपीं ठेविजे ॥ ८ ॥

त्यांत एक गोष्ट लक्षांत ठेवावी, कीं जिकडे ह्मणून मनाची प्रवृत्ति झाली. त्या प्रवृत्तीच्या पाठीं न लागतां माघारी दृष्टि आणून स्वस्वरूपाजवळ ठेवावी. (८)

मन जो जो विषय धरी ॥
तो तो विवेकें विदारीं ॥
तरी तो स्थिरावे अंतरीं ॥
सांडूनि कल्पना ॥ ९ ॥

असें करणें युक्तीचें काम आहे. ह्मणून काय करावें, कीं मनांत जो जो ह्मणून विषय येईल तो तो विषय विचारानें मनांतून काढून टाकीत गेलें असतां कल्पनेचा नाश होऊन तें मन अंतःकरणांत स्थिर होऊन बसेल. (९)

तेथें हृदयाकाशीं ॥
मीपण स्फुरे जीवासी ॥
तेंचि विवेकेंसीं ॥
पाहिजे जंव ॥ १० ॥

मन अशा प्रकारें अंतरांत जाऊन स्थिर झालें, ह्मणजे अंतःकरणाकाशांत जीवाला मीपणाचें स्फुरण होऊं लागतें. त्या स्फुरणाविषयीं विचार करून पाहूं लागलें असतां. (१०)

तंव तें निरालंबीं स्फुरे ॥
पुनरपि तेथेंचि मुरे ॥
तरी जीवदशा बा रे ॥
नास्तिक्य पावे ॥ ११ ॥

तें स्फुरण स्वतंत्र असून पुन्हां जागच्या जागींच मुरून जातें. असा प्रकार विवेकदृष्टीनें दिसूं लागला, ह्मणजे जीवत्वदशेचा नाश होतो. (११)

नदी उगमीं स्थिरावे ॥
तरी सिंधूपण कां न पावे ॥
तैसें जीवाचें ब्रह्म कां न व्हावें ॥
या स्थितीं राहतां ॥ १२ ॥

न्यायाचीच गोष्ट आहे, कीं नदी उगमांतच स्थैर्य पावेल, तर सागराच्या योग्यतेस कां येणार नाहीं ? त्याचप्रमाणें अंतःकरणांत उत्पन्न होणारी जीवस्फूर्ति मुरल्यावरोवर जीवाचें ब्रह्म कां होऊं नये ? (१२)

ह्मणूनि परतावें अभ्यंतरीं ॥
अभ्यास करावा ऐशिया परी ॥
मग कल्पना अभ्यंतरीं ॥
समरसोनि जाय ॥ १३ ॥

ह्मणून करावें काय, कीं बाह्य वृत्ति सोडून परतून अंतःकरणांत शिरावें, आणि अशा प्रकारानें अभ्यास चालू ठेवला असतां कल्पना अंतःकरणांत समरस होऊन जाते. (१३)

सोडून स्थूळ गती ॥
ऐशी राहे अंतरस्थिती ॥
तोंवरी अभ्यास निगुतीं ॥
करावाचि लागे ॥ १४ ॥

हा अभ्यास करण्याची इयत्ता इतकी आहे, कीं स्थूलगति सोडून ह्मणजे मनोवृत्ति बंद होऊन अंतःकरणांत समरसता होईतोंपर्यंत अभ्यास निश्चयानें केलाच पाहिजे. (१४) असा

तेथें जें जें दृश्य स्फुरे ॥
तें तें सोडून होयीं माघारें ॥
ज्ञानस्वरूप निर्धारें ॥
आपण होइजे ॥ १५ ॥

अभ्यास करीत असतांना जें जें काहीं दृश्यस्फुरण होईल तें तें सोडून, अथवा त्याचा त्याग करून आपणच ज्ञानस्वरूप बनून जावें. (१५)

देखणेंचि देखण्यावरी ॥
परतोन राहे जरी ॥
तरी दृश्याकारा उरी ॥
कैसेनि होय ॥ १६ ॥

ह्मणजे देखणेंच देखणें सोडून माघारें परतून राहील अथवा पहाणेंच पहाण्याचा विषय सोडून परतून आपल्याच ठिकाणावर येऊन राहील, तर दृश्य आकाराला उरायाला ह्मणजे रहायाला जागा तरी कुठें राहील ? (१६)

साकारादि आघवें ॥
शून्य होय स्वभावें ॥

ह्मणून साकार तेथून सर्वच सहजीं शून्य होऊन जातात. करतां आपण काय करावें, कीं साकारांतच आपण आ-

तेथें आपण पाहावें ॥
आत्मस्वरूप ॥ १७ ॥

पलें स्वरूप पहावें, ह्मणजे अभ्यासाच्या योगानें सर्वत्र आत्म स्वरूपच पहावें. (१७)

जैसें वाढलिया प्रलयनीर ॥
नुरे कांहीं आकार ॥
अंतःकरणादि व्यवहार ॥
तैसा होय ॥ १८ ॥

अशा पहाण्यांत अंतःकरणाचा व्यवहार, प्रलयपाणी झालें असतां जसा कांहीं आकार रहात नाहीं, तद्वत् होतो. ह्मणजे आत्मस्वरूपावांचून दुसरें कांहीं दिसेनासें होतें. (१८)

जैसें कूर्में आकुंचन केलें ॥
कर चरण शीर अंतरीं नेलें ॥
मग आपणिया आपण उरलें ॥
अखंडित ॥ १९ ॥

ह्मणून अखंडित आपलें आपणच उरण्याकरतां कूर्म जसा आपले करचरण-शिर आकुंचन करून घेतो, त्या प्रमाणें जाणिवेच्या बळानें मन आणि इंद्रियें समरस करून आपण अंतराकाशांत नेऊन सोडलीं पाहिजेत. (१९)

जाणिव याचिपरी ॥
प्रवेशतां अंतरीं ॥
तेथें एकलीच उरे उरी ॥
आपणियाची ॥ २० ॥

अशा प्रकारें जाणिवेचा प्रवेश अंतराकाशांत झाला, ह्मणजे त्या ठिकाणीं जाणिव एकटीच सर्वांना उरून उरते. (२०)

आपण एकीं एकला ॥
दुजा नाहीं देखिला ॥
ज्ञानमात्र संचला ॥
आत्माराम ॥ २१ ॥

मग मात्र आपला आपण एकटाच दिसत असून दुसरा कोणी त्या ठिकाणीं दिसत नाहीं ह्मणजे ज्ञानमात्र आत्माराम सर्वत्र भरला आहे असें दिसतें. (२१)

इति श्रीपरमामृते मुकुंदराजविरचिते अभ्यासयोगो नाम
नवमप्रकरणं संपूर्णम् ॥ ९ ॥

---

# प्रकरण १० वें.

## दृश्यभासखंडन.

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीगुरुभ्यो नमः ॥

ऐसा उमज न होतां ॥
अज्ञान गडदामाजी पडतां ॥
न कळे ह्मणोनि भ्रमतां ॥
वेड लागे ॥ १ ॥

मी मी ह्मणून जें कांहीं अहंकारानें आपण मी ह्मणत असतों, तें अहंकारी स्वरूप वास्तविकपणें मी नाहीं, या गोष्टीचा उमज भरगच्च अज्ञानांत पडला असल्याकारणानें होत नाहीं! ह्मणून भ्रमिष्ट वेड्यासारखी स्थिति होते. (१)

तो भ्रम आपणचि वाहे ॥
नाथिलें अज्ञान धरूनि राहे ॥
वायां संदेहीं पाहे ॥
न कळे ह्मणोनी ॥ २ ॥

उघडच आहे, कीं कळत नाहीं ह्मणून व्यर्थ संदेहांत पडायाचें, आणि त्या संदेहांत नसत्या अज्ञानाला धरून भ्रम वाहायाचा! (२)

उजेडींचा घरांत आला ॥
तंव दृष्टीं अंधार भरला ॥
डोळे असतां अदेखणा झाला ॥
आपणाशीं तो ॥ ३ ॥

ह्मणजे असा प्रकार व्हावयाचाच, कीं उजेडांतून घरांत आलें असतां आपल्या दृष्टींत जसा आंधार भरतो अर्थात् कांहीं वेळ दिसेनासें होतें ह्मणजे डोळे असून तो आपला आपणच आंधळा होतो! (३)

कां निशीचिया दोनप्रहरीं ॥
डोळियां गडद पडे भारी ॥
तैसा अज्ञान आंधारीं ॥
गुंतों नको ॥ ४ ॥

अथवा रात्रींच्या दोन प्रहरीं डोळ्यांभोंवतीं जसा गर्द अंधार असतो, त्याप्रमाणें या दृश्यवस्तुरूप अज्ञानांधकारांत तूं गुंतूं नकोस. (४)

तेथें मनासि जें जें कल्पणें ॥
तें तें सन्मुख देखणें ॥

कारण या अज्ञानांधकारांत का एकदां गुंतून गेलास, तर होईल काय, कीं मनांत जी जी ह्मणत कल्पना करशील,

दृश्य निरसोनि राहणें ॥
स्वस्वरूपीं निश्चयत्वें ॥ ५ ॥

ती ती मूर्तिमंत तुझ्यापुढें येऊन उभी राहील! ह्मणून कर काय, कीं दृश्य वस्तूंचा निरास करून स्वस्वरूपीं निश्चल-त्वानें रहा. (५)

बोलें आपण आपणासी ॥
अंतरीं आपणा आपण उपदेशीं
पाहें तया विवेकासी ॥
कांहीं आकार असेना ॥ ६ ॥

आणि बोलायाचें तें आपल्याचजवळ बोल. उपदेश करावयाचा तरी अंतःकर-णांत आपला आपल्यालाच कर, आणि मग विचार करून पहा, कीं ज्याच्याज-वळ बोलायचें आणि ज्याला उपदेश करा-याचा त्या ठिकाणीं कांहीं आकार दिसतो का (६) तेव्हां

जेथूनि उपज विवेक मातू ॥
पाहें तया अंतःकरणांतू ॥
तेंहि धरूनि जाणिव हेतु ॥
जाणतें होय ॥ ७ ॥

आकार तर कांहीं दिसत नाहीं, परंतु वस्तुस्थिति अशी दिसते, कीं ज्या ठिकाणांतून विवेकाची गोष्ट निघते; तें ठिकाण पाहूं गेलें, तर अंतःकरण दिसतें, आणि तेंच अंतःकरण जाणिव हेतू धरून जाणतें होतें. (७)

देहासहित ब्रह्मांड शून्य ॥
झालिया उरे परिपूर्ण ॥
कांहीं न दिसे स्थानमान ॥
कवणे ठायीं ॥ ८ ॥

त्या जाणिवेनें ह्मणजे ज्ञानानें पाहूं गेलें असतां देहासहित सर्व ब्रह्मांड शून्य झाल्यावर स्थानमान कोठेंच कांहीं न दिसतां सर्वत्र परिपूर्ण भरून उरलेलें स्वस्वरूप दिसतें. (८)

साकार हा त्रिलोकु ॥
नेणों काय झाला सकळिकु ॥
संचलों मी एकाएकु ॥
चिदाकाश ॥ ९ ॥

मग कसला साकार त्रैलोक्य आणि काय? कोठचा कोठें नाहींसा होऊन सर्व मीच मी एकीएक प्रकाशरूप संचलों आहें असें विवेकदृष्टीनें दिसतें. (९)

अंतर्बाह्य परिपूर्ण ॥
शून्य झालें दृश्याचें भान ॥

तेव्हां होतें काय, कीं अंतर्बाह्य दृश्य-भास शून्यवत् अर्थात् नाहींसा होऊन

असणें आपणिया आपण ॥
एकत्वरहित ॥ १० ॥

एकपणही मोडलें जातें, आणि आपला आपणच राहतो. (१०)

तेथें आंधारी गेली ॥
मनबुद्धी मावळली ॥
आत्मप्रभा उजळली ॥
चिदादित्याची ॥ ११ ॥

त्या वेळीं आंधारी ह्मणजे अज्ञान नाहींसें होतें, मनबुद्धीचा खेळ मावळून जातो, आणि आत्मप्रभा ज्ञानरूपानें उजळली जाते. (११)

येणेंपरी स्थूळाचा ॥
प्रवृत्त मोडला जागृतीचा ॥
आतां निरास लिंगदेहाचा ॥
तैसाच कीजे ॥ १२ ॥

अशा प्रकारें स्थूळदेहाच्या जागृतावस्थेची प्रवृत्ति मोडल्यावर लिंगदेहाच्या अवस्थेचाही तशाच प्रकारानें निरास करतां येतो. (१२)

स्फूर्ति स्फुरे जेथुनी ॥
ते पहिलेंचि असे अस्फूर्तिपणीं ॥
मज देखतां उमटोनी ॥
मावळे स्फूर्ति ॥ १३ ॥

तो असा, कीं ज्या ठिकाणांतून स्फूर्ति उत्पन्न झाली असें वाटतें, ती स्फूर्ति अस्फूर्तिपणानें मूळचीच तेथें असते. पण मजदेखतां ह्मणजे आत्मस्वरूप उमटल्याबरोवर ती स्फूर्ति जागच्या जागीं मावळून जाते. (१३)

तूं तये स्फूर्तीचा जाण ॥
संकल्पविकल्पाचें जीवन ॥
निश्चयाचें कारण ॥
तूंचि असे ॥ १४ ॥

ह्मणून या स्फूर्तीचा जाणता तूं आहेस, संकल्पविकल्पाचें जीवनही तूंच आहेस, आणि निश्चयाचें कारण पण तूंच आहेस. (१४)

अनुसंधान पूर्वींच असे ॥
ह्मणूनि तें उपजतां तुज दिसे ॥
अहंता तुझेनि आंगें वसे ॥
तेही तूंचि जाण ॥ १५ ॥

आणि अनुसंधान ह्मणजे ध्यास लागणें हा पूर्वींचाच प्रकार आहे ह्मणून अनुसंधान सुरू झालेलें तुला दिसतें. अहंकार तुझ्याच बळानें आंगीं जडतो ह्मणून त्याचाही तूंच जाणता आहेस. (१५)

ऐसें पांचां भेदीं अंतःकरण ॥
हेही तूंचि स्फुरे जाण ॥

अशा पांच प्रकारच्या अंतःकरणस्फूर्ति तूंच असल्याकारणानें त्या स्फूर्ती

तें सांडितां काय तुजविण ॥
वेगळें पडे ॥ १६ ॥

सोडल्या तर त्या तुझ्यावांचून वेगळ्या थोड्याच होणार आहेत? कारण त्या सोडून सुटण्यासारख्या नाहींत. सोडणें हा भाव फक्त भावनेचा आहे. (१६)

जळें तरंग केवीं सांडावा ॥
आकाशें वायू केवीं दवडावा ॥
तेवीं तुझिया स्फूर्तिभावा ॥
कैसेनि दवडिजे ॥ १७ ॥

कारण असें पहा, कीं तरंगाला सोडून देईन असें पाणी ह्मणेल तर पाण्याला तसें करतां येईल का; अथवा वायूला हांकून लावूं असें आकाश ह्मणेल तर तसें आकाशाला करतां येईल का? नाहीं. तरंग आणि वारा हे पाणी आणि आकाश यांच्यांतच उत्पन्न होणारे आहेत. त्याचप्रमाणें अंतःकरणस्फूर्तिपंचक तुझ्यांतच ह्मणजे स्वरूपांतच होत असल्यानें, त्याला दवडून देतां येत नाहीं. (१७)

तरंग जळीं विरे ॥
वायू गगनीं मुरे ॥
तैशी तुझी स्फूर्ति स्फुरे ॥
तुजमाजी ॥ १८ ॥

तथापि तरंग ज्याप्रमाणें जळांत विरतो, अथवा वायू गगनांत मुरतो, त्याप्रमाणें तुझी स्फूर्ति तुजमध्येंच स्फुरण होते आणि तुजमध्येंच लीन होऊन जाते. (१८)

झाडितां आपला हात ॥
तंव आंगासि असे जडित ॥
तैसी अंतःकरणस्फूर्ति मूर्तिमंत
कैशी सांडिशी ॥ १९ ॥

आणखी असें पहा, कीं आपला हात झाडला, तर तो निराळाच न होतां आंगाला जसा जडलेलाच राहातो, त्याप्रमाणें अंतःकरणस्फूर्ति तुझीच असल्यानें ती सांडून अर्थात् टाकून कशी देतां येईल? (१९)

सांडूं पाहशी तंव तेचि स्फूर्ति ॥
करूं पाहशी तंव तेचि वृत्ति ॥

अंतःकरणपंचकस्फूर्ति कां सोडतां येत नाहीं त्याचें कारण असें आहे, कीं सांडायाला अर्थात् टाकायाला जाशील, तर त्यागक स्फूर्ति आहे, कांहीं करा-

विचारूं पाहसी तंव तेचि मति
मनचित्तें ॥ २० ॥

याला लागशील, तरी तीच वृत्ति स्वरूप आहे, विचार करायाला लागलास तर तेंच स्वरूप मति ह्मणजे बुद्धि आहे, आणि मन आणि चित्तही तेंच आहे. (२०)

चिंतूं पाहसी तंव तें चित्त ॥
मी ह्मणतां अहंकार होत ॥
उगाचि असतां स्वस्थ ॥
स्वस्थता स्फुरे ॥ २१ ॥

ह्मणून चिंतन करायाला लागलास तर तेंच चित्त होतें, मीपणा घेण्याबरोबर तेंच स्वरूप अहंकार बनतें, आणि उगीच स्तब्ध राहिलें, तर स्वस्थता स्फुरूं लागते. (२१)

जरी उगाचि असता ॥
तरी कां आठवू स्फुरता ॥
संकल्पविकल्प करिता ॥
कासयासी ॥ २२ ॥

ह्मणून तें उगीच आहे ह्मणावें, तर आठव स्फुरतो आणि संकल्पविकल्पही होतात! (२२)

एक निश्चय धरिता ॥
तरी कां पुनःपुन्हां चिंतिता ॥
देहत्वें कां आंगवता ॥
मी ह्मणोनी ॥ २३ ॥

बरें एक निश्चय असता तर मग वारंवार चिंतन कां करता? आणि देहाच्या योगानें मी मी तरी कां ह्मणत असता? (२३)

ह्मणोनि हें असतचि सरे ॥
ऐसें वर्म आहे बा रे ॥
तें ज्ञान नसतें तरी अहंकारें ॥
केविं उठिजे ॥ २४ ॥

ह्मणून यांत वर्म ह्मणून खरी खरी किल्ली इतकीच आहे, कीं या सर्व स्फूर्तिभावना असतांना त्या सारून ह्मणजे नाहींशा करून टाकायाच्या आहेत. परंतु त्या सर्व नाहींशा करायाच्या ह्मणजे अहंकाराला नाहींसें करायाचें आहे. परंतु ज्ञानाचा जर अभाव असता, तर अहंकार तरी कुठें उत्पन्न होता? (२४)

आठव चित्तीं जो राहे ॥
तें ज्ञान नव्हे तरी काये ॥
ज्ञानेंवीण स्थिरत्व आहे ॥
बुद्धीस कोठें ॥ २५ ॥

ह्मणून चित्तांत जो आठव आहे, त्याचेंच नांव ज्ञान, आणि ज्ञान आहे ह्मणून बुद्धिला स्थिरत्व येतें. (२५)

तें ज्ञान जरी अधिष्ठान ॥
तरी संकल्पविकल्पात्मक मन ॥
तेंचि ज्ञान परिपूर्ण ॥
यालागीं स्फुरण असेना ॥२६॥

आणि मनाच्या संकल्पविकल्पांना तेंच ज्ञान अधिष्ठान असल्याकारणानें तें परिपूर्ण ज्ञान आहे, ह्मणून त्याला स्फुरण नाहीं. (२६)

तें स्मरतां नये स्मरण ॥
स्मरण जयाचें विस्मरण ॥
तें ज्ञान ना अज्ञान ॥
ज्ञप्तिमात्र जें ॥ २७ ॥

तेव्हां अर्थातच स्मरण करूं लागलें असतां तें स्मरतां येत नाहीं, आणि स्मरण होत नाहीं ह्मणून स्मरण तेंच विस्मरण आहे. याकरितां त्याला ज्ञान ह्मणतां येत नाहीं व अज्ञानही ह्मणतां येत नाहीं; परंतु कांहीं ह्मणायाचेंच झालें तर ज्ञप्ति-मात्र अथवा ज्ञानकला ह्मणतां येईल. (२७)

कांहीं वृत्तिभास भासे ॥
तो स्फुरतांचि तया दिसे ॥
परी स्वतां आपण असे ॥
निराभास ॥ २८ ॥

कारण कांहीं वृत्तिस्फुरणाच्या योगानें भास भासतो, परंतु आपण स्वतः ज्ञप्ति-मात्र निराभास असतो. (२८)

तो निराभास ह्मणावा कवण ॥
तेचि तया असे जाण ॥
जाणिवही जिरवून ॥
आंगींचे आंगीं ॥ २९ ॥

हा निराभास कोणाला ह्मणायाचें हाच काय तो जाणण्याचा भाग आहे. कारण निराभास जाणतां आल्यावांचून दृश्याचा त्याग करतां येणार नाहीं. ह्मणून नि-राभास जाणण्याकरतां जाणिवेला आंगच्या आंगीं जिरविली पाहिजे. (२९)

यालागीं जाणिव नेणिव ॥
भाव ना अभाव ॥
तेंचि तें स्वयमेव ॥
स्वस्वरूप ॥ ३० ॥

कारण निराभासाच्या ठिकाणीं जा-णिव-नेणिव अथवा भाव-अभाव ह्या वृत्ति नसून तें स्वयमेव स्वस्वरूप आहे. (३०)

इति श्रीपरमामृते मुकुंदराजविरचिते दृश्यभासखंडनं नाम दशमप्रकरणं संपूर्णम् ॥ १० ॥

# प्रकरण ११ वें.

## अज्ञानखंडन.

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीसरस्वत्यै नमः ॥ श्रीगुरुभ्यो नमः ॥

आपण आपणासि नेणें ॥
ऐसें आपणचि जाणें ॥
जाणपण हें नुमजणें ॥
तेंचि पैं तें ॥ १ ॥

आपणच आपल्याला ओळखी नाहीं असें आपण जाणणें, म्हणजे जाणपणाला नुमजणें अर्थात् अज्ञान करणें होय. (१)

नेणिवेच्या ग्रासें ॥
जाणिव उरली दिसे ॥
तेचि तेथें वसे ऐसें ॥
केविं घडे ॥ २ ॥

कारण नेणिवेच्या ग्रासानें म्हणजे जाणत नाहीं असें ओळखल्यानें जाणिव जर दिसूं लागेल, तर ती जाणिवच नेणिव होत असल्याकारणानें ती तरी तेथें कशी असूं शकेल? (२) शक्यच गोष्ट नाहीं.

जाणिवा नेणिवा ॥
दोहीं विरहित भावा ॥
दोहीं बीजां वोलावा ॥
विस्तारिता तो ॥ ३ ॥

कारण तो परमात्मा जाणिव आणि नेणिव या दोन्ही भावांविरहित असून जाणिव आणि नेणिव अशा दोन प्रकारच्या बीजांना ओलावा देऊन त्यांचा विस्तार करणारा आहे. (३)

तो जाणिवा नेणिवा ॥
नातुळे दोन्ही भावां ॥
आधींच असे तो जाणावा ॥
स्वरूपानंद ॥ ४ ॥

तो परमात्मा असा आहे, कीं तो जाणिव आणि नेणिव या दोन्ही भावांनीं दोषयुक्त होत नसून आधींचाच तो स्वरूपानंद असल्यानें (४)

कांहींच न स्फुरतां आदी ॥
जें स्थळ असे अनादी ॥
जे ज्ञानाची कदी ॥
ज्ञप्तिमात्र ॥ ५ ॥

कोणत्याही प्रकारचें स्फुरण होण्यापूर्वींच अनादि अशा स्थळावर तो असतो, त्या योगानें तो केवळ ज्ञानाची कदी म्हणजे कोंदणच ज्ञप्तिमात्ररूपानें आहे. (५) आणि

जें निष्कलंक ज्ञानघनानंद ॥
आपणचि आपण स्वतःसिद्ध ॥
निजरूप विशुद्ध ॥
स्वसंवेद्य ॥ ६ ॥

तो निष्कलंक, ज्ञानघनानंद, आपला आपण स्वतःसिद्ध, आणि अत्यंत शुद्ध-रूपानें स्वसंवेद्य ह्मणजे स्वतःला जाणता असा आहे. (६)

जें जाणेचि जाणणें ॥
ह्मणून नाहीं तेथें नेणणें ॥
तें आपआपण एकपणें ॥
जाणे ना नेणें ॥ ७ ॥

"जें जाणेचि जाणणें" ह्मणजे जें आपलें ह्मणून आपल्याला जाणतें, त्याच्या ठिकाणीं नेणणें रहात नाहीं. कारण एक-पणानें तें आपल्याला जाणतही नाहीं आणि नेणतही नाहीं. (७)

तें परिपूर्ण एकलें ॥
ह्मणोनि दिसावें हें खुंटलें ॥
घनानंद कोंदाटलें ॥
स्वस्वरूप ॥ ८ ॥

असें परमात्मस्वरूप एकच परिपूर्ण भरलें असल्याकारणानें त्याच्या ठिकाणीं दुजा दृश्यभाव खुंटतो ह्मणजे नाहींसा होतो. कारण स्वस्वरूपच घनानंद सर्वत्र कोंदाटून गेलें आहे. (८)

दिसतें तें दुसरें ॥
तेंही जेथें सरे ॥
मग देखणेंचि उरे ॥
तेंचि तया केविं दिसे ॥ ९ ॥

आतां जें दिसतें त्याच्या ठिकाणीं दुसरेपणा आहे. तो दुसरेपणा नाहींसा झाला ह्मणजे एकच देखणें उरतें, तें पाहाणाराला कसें दिसेल? (९)

तें देखणेंचि देखणें ॥
ह्मणोनि तयासि तें पाहणें ॥
जें जाणवलें तें निरसणें ॥
उरे तेंचि ॥ १० ॥

या पाहाण्यांत मुख्य मुद्याची गोष्ट ही लक्षांत ठेवली पाहिजे, कीं दुसरेपण नाहींसें करून पाहायाचें आहे. ह्मणजे ज्याचें त्यानेंच आपलें आपल्याला पाहा-याचें आहे. आतां देखणेंच ह्मणजे पहा-णाराच आपल्याला पाहूं लागतो ह्मणून त्याच्या पाहाण्याला पाहणें ह्मणायाचें. मग पाहून जें समजतें, त्याचा निरास झाला ह्मणजे जें उरतें तें देखणें होय. (१०)

दृश्य द्रष्टा दर्शन ॥
या तिन्ही भावांविलक्षण ॥
एकलेंचि आपण ॥
ज्ञप्तिमात्र ॥ ११ ॥

हें देखणें दृश्य, द्रष्टा आणि दर्शन या तिहीं भावांविलक्षण असून एकच आपण ज्ञप्तिमात्ररूपानें आहे. (११)

दृश्य दर्शन हारपे ॥
तेथें उरिजे स्वस्वरूपें ॥
अखंडित आपआपें ॥
निरामय ॥ १२ ॥

म्हणजे दृश्य आणि दर्शन हे प्रकार हारपले म्हणजे नाहींसे झाल्यावर जें कांहीं उरतें, तें स्वस्वरूप अखंडित आपेआप आणि निरामय म्हणजे विकाररहित असें आहे. (१२)

जाय लया सर्व दिसणें ॥
तेथें खुंटलें देखणें ॥
मग देखणें आपुलेया खुणें ॥
सदोदित ॥ १३ ॥

म्हणून दिसणारा तेवढा सर्व प्रकार आटपला म्हणजे देखणें खुंटतें अर्थात् बंद होतें, आणि मग आपल्या खुणेनें सदोदित देखणें असतें. (१३)

तें आपणचि आपण ॥
अविनाश परिपूर्ण ॥
ऐसें ओळखावें परतोन ॥
स्वस्वरूप ॥ १४ ॥

तेंच आपलें आपण परतोन अविनाश परिपूर्ण स्वस्वरूप आहे असें ओळखावें. (१४)

नेणिवेच्या निरासें ॥
कारणशरीर नासे ॥
जाणिवही समरसे ॥
महाकारणीं ॥ १५ ॥

अशा प्रकारें नेणिवेचा निरास केला म्हणजे त्याच्यावरोबर कारणशरीराचाही निरास होतो, आणि जाणिव समरसांत लीन झाली म्हणजे तिच्यावरोबर महाकारणदेहाचाही निरास होतो. (१५)

सुषुप्ति आणि तुर्या
प्राज्ञ प्रत्यगात्मा अभिमानिया
विश्व तैजस गेलिया ॥
जागृति स्वप्न कैचें ॥ १६ ॥

तात्पर्य प्राज्ञ आणि प्रत्यगात्मा, त्याचप्रमाणें विश्व आणि तैजस हे अभिमान गेल्यावर त्यांच्या अनुक्रमें सुषुप्ति, तुर्या, जागृति आणि स्वप्न या तरी अवस्था कोठून राहणार? (१६)

एवं देहचतुष्टयाचे निरासा ॥
करूनि जाणिजे अविनाशा ॥
तंव आपणचि स्वयंप्रकाशा ॥
ज्ञानघना ॥ १७ ॥

अशा प्रकारें देहचतुष्टयाचा निरास केल्यावर अविनाशस्वरूप आपले आपणच स्वयंप्रकाश ज्ञानघन आहोंत असें जाणतां येतें. (१७)

सांडूनि आपुले जाणिवेशी ॥
जैं स्वस्थ उगा राहासी ॥
तैं काय आहे मग जाणशी ॥
निःसंगपणें ॥ १८ ॥

हें कसें जाणतां येईल ह्मणशील, तर इंद्रियसंग सोडून निःसंग हो आणि जाणिवेला बाहेर घालवून स्वस्थ रहा ह्मणजे मग हें काय स्वरूप आहे तें तुला जाणतां येईल. (१८)

जेव्हां जाणिवेतें सोडिलें ॥
तेव्हां स्फुरणचि खुंटलें ॥
उठलें ठायीं लया गेलें ॥
तुजचिमाजी ॥ १९ ॥

अशा रीतीनें पाहूं लागलास, तर काय होईल, कीं जाणिव सोडून दिल्याबरोबर लगेच स्फुरण बंद होईल, आणि ज्या तुझ्या ठिकाणांतून तें स्फुरण उठलें त्याच ठिकाणीं तें लयास जाईल. (१९)

जाणिव शून्यासहित ॥
तुजमाजी सामावत ॥
तो तूं आत्मा अपरिमित ॥
स्वयंभमूर्ति ॥ २० ॥

स्फुरण लयाला गेलें ह्मणजे होईल काय, कीं जाणिव शून्यासहित तुझ्यांत सामावली जाऊन तूं आत्मा अपरिमित स्वयंभमूर्ति आहेस असा प्रकाश होईल. (२०)

जेथें जाणिव नेणिव नाहीं ॥
शब्द निःशब्द कांहीं ॥
रूपअरूप हेंही ॥
नेणिजे सोय ॥ २१ ॥

त्या आत्मस्वरूपांत जाणिव नाहीं, नेणिव नाहीं, शब्द नाहीं, निःशब्द नाहीं, मग रूपअरूपाची तर गोष्टच बोलायाला नको. अर्थात् रूपअरूप असला भागच त्या स्वरूपाच्या ठिकाणीं नाहीं. (२१)

देखतें ना अदेखण ॥
परकीय ना आपण ॥
स्मरण ना विस्मरण ॥
स्मृतिमात्र जें ॥ २२ ॥

त्याचप्रमाणें देखतें नाहीं, अदेखणेपणही नाहीं, परकीयपणा नाहीं, आपलेपणाही नाहीं, स्मरण नाहीं, विस्मरणही नाहीं, फक्त स्मृतिमात्र आहे. (२२)

| | |
|---|---|
| वृत्ति ना निवृत्ती ॥<br>अपूर्ण ना पूर्ण स्थिती ॥<br>अभाव ना भावप्रतीती ॥<br>प्रतीतिमात्र जें ॥ २३ ॥ | वृत्ति नाहीं, निवृत्तिही नाहीं, अपूर्ण नाहीं, पूर्ण स्थितीही नाहीं, अभाव नाहीं, भावप्रतीतिही नाहीं, परंतु प्रतीतिमात्र आहे. (२३) |
| धरितां सोडितां नये ॥<br>नाहीं आहे ह्मणणें राहे ॥<br>अनुभवीं अनुभवितां नये ॥<br>ठायीं नेणिजे ॥ २४ ॥ | ह्या आत्मस्वरूपाचें आणखी लक्षण असें आहे, कीं, या स्वरूपाला धरतां येत नाहीं व सोडतांही येत नाहीं, स्वरूप आहे नाहीं ह्मणायाला जावें तर बोलणेंच खुंटतें, आणि अनुभवी जो आहे, त्याला अनुभवांत ठाव लागत नाहीं. (२४) |
| ऐसें हें अभ्यासणें ॥<br>अंतरींचें अंतरीं जाणणें ॥<br>निश्चळ स्वरूपीं स्थिरावणें ॥<br>कीजे मनाचें ॥ २५ ॥ | अशा प्रकारचा हा अभ्यास आहे. त्याचा प्रकार अंतरांतल्या अंतरांत जाणून निश्चळ स्वरूपावर मनाला आणून स्थिर केलें पाहिजे. (२५) |
| स्वस्वरूप जाणिजे ॥<br>मग आलिंगोनि राहिजे ॥<br>स्वयेंचि चंचळपण कीजे ॥<br>कल्पनाव्यापार ॥ २६ ॥ | परंतु असा अभ्यास करीत असतां होत असतें काय कीं, स्वस्वरूप जाणावें अथवा ओळखावें, आणि त्याला आलिंगन देऊन अर्थात् धरून रहावें, इतक्यांत चंचलता उत्पन्न होऊन कल्पनाव्यापार सुरू होतात. (२६) |
| ऐसें करितां मन विरमे ॥<br>विषयव्यापार शमे ॥<br>मग चित्त रमे ॥<br>कांहीं कांहीं स्वस्वरूपीं ॥२७॥ | अशा कल्पनाव्यापारांत मन रमत आहे, इतक्यांत विषयव्यापार शम पावून स्वस्वरूपाच्या ठिकाणीं कांहीं कांहीं वेळ चित्त रममाण होतें. (२७) |
| विसरे प्रकाशे स्वरूप ॥<br>हारपे सांपडे आपेआप ॥ | आणि अशा प्रकारें मनोव्यापाराचा विसर पडतांच स्वरूपप्रकाश होऊन विसराच्या योगानें जें हारपलेलें असतें, तें |

| | |
|---|---|
| ऐसा करितां आक्षेप ‖<br>मन स्थिरावे ‖ २८ ‖ | आपोआप सांपडतें, आणि असाच अभ्यास चालविला असतां मन स्थिरावत जातें. (२८) |
| निवांत भोगी स्वरूप ‖<br>डुल्लत आनंदें आपेआप ‖<br>मग तया सुखाचें माप ‖<br>कवण करी ‖ २९ ‖ | आणि मन एकदां का स्थिरावलें ह्मणजे निवांत स्वरूपभोग प्राप्त होऊन आनंदानें आपोआप डुलूं लागतो. अशा सुखांत का एकदा पडला ह्मणजे मग त्या सुखाचें मोजमाप तरी कोणाला करतां येणार आहे ? (२९) |

इति श्रीपरमामृते मुकुंदराजविरचिते अज्ञानखंडनं नाम एकादशप्रकरणं संपूर्णम् ‖ ११ ‖

---

## प्रकरण १२ वें.

## स्वानुभवसुखवर्णन.

श्रीगणेशाय नमः ‖ श्रीगुरुभ्यो नमः ‖

| | |
|---|---|
| स्वेदकंपादि उठती ‖<br>अष्ट सात्विकभाव प्रगटती ‖<br>पावे साम्राज्यसंपत्ती ‖<br>रंक जैसा ‖ १ ‖ | स्वानुभवसुख प्राप्त झालें असतां त्याचीं लक्षणें ह्मणजे स्वेदकंपादि अष्ट सात्विक भाव प्रगट होऊं लागतात. आणि एकाद्या रंकाला साम्राज्यसंपत्ति प्राप्त झाली असतां त्याची जशी स्थिति होते, त्याप्रमाणें त्याची स्थिति होते. (१) |
| चित्त चैतन्यीं हारपे ‖<br>उरिजे ज्ञप्तिस्वरूपें ‖<br>अखंडित आपआपें ‖<br>ब्रह्मानंद ‖ २ ‖ | स्वानुभवसुखप्राप्तीचे वेळीं चित्त चैतन्यामध्यें हारपून जाऊन ज्ञप्तिस्वरूप अखंडित आणि आपोआप ब्रह्मानंदांत निमग्न असतें. (२) |

तया सुखाचेनि समरसें ॥
पावे सुलीन दशे ॥
तें बोलावें कैसें ॥
अनुभवी जाणती ॥ ३ ॥

चित्तचैतन्याचा समरस झाला ह्मणजे सुलीन दशा प्राप्त होते. त्या सुलीन दशेंतील सुख अनुभवी जे आहेत तेच मात्र जाणतात. बोलून दाखवितां येण्यासारखें तें नाहीं. (३)

जैसें अमृत चाखे आपुले चवी
तैसें स्वसुखें अनुभवी ॥
तेथें कोण आठवी ॥
संसारासी ॥ ४ ॥

अमृत चाखून अर्थात् तें जिभेवर ठेवून जशी त्याची चव ह्मणजे रुचि समजायाची मात्र परंतु बोलून दाखवितां येत नाहीं, त्याप्रमाणें स्वसुखअनुभवप्राप्ति होऊं लागली ह्मणजे त्या सुखाची गोडी समजते मात्र, पण ती स्पष्ट करून सांगतां येत नाहीं. अशा त्या स्वसुख-अनुभवांत संसाराची आठवण देखील होत नाहीं. (४)



वोळे स्वानंदाचा घन ॥
दाटे सुख परिपूर्ण ॥
तयामाजी विवेक सुजाण ॥
हारपोंनि जाय ॥ ५ ॥

मग तो केवळ स्वानंदाचा घनच बनतो, आणि त्या कारणानें त्याच्या भोंवतीं सुखांची दाटी होऊन जाते, आणि त्या सुखांच्या दाटीमध्यें सुजाण विवेक हाही हारपून जातो. (५)

अहंता स्वरूपीं गळे ॥
विषयतृष्णा मावळे ॥
इंद्रियांचे लळे ॥
क्रियेविण पूर्ण होती ॥ ६ ॥

आणि स्वस्वरूपदर्शन झाल्याच्या योगानें अहंता गळून जाते अर्थात् नाहींशी होते, विषयांवरील इच्छा मावळून जातात, आणि क्रियेवांचून इंद्रियांचे लळे पुरतात. (६)

महासुखाचे अरुवारीं ॥
आलिंगी स्वानुभूती सुंदरी ॥
ज्ञानमात्र इयापरी ॥
स्वस्वरूप भोगी ॥ ७ ॥

या महासुखाच्या अरुवारीं ह्मणजे घरांत स्वानुभवी जो आहे, तो अनुभूती-नामक सुंदरीचें आलिंगन घेतो ह्मणजे ज्ञानी मात्र अशा प्रकारानें स्वस्वरूपाचा भोग घेतो. (७)

निरसितां नेणिव ॥
स्वरूपीं समरसे जाणिव ॥
मग एकछत्री राणिव
योगियासी ॥ ८ ॥

नेणिव ह्मणजे अज्ञान नाहींसें होण्याबरोबर स्वरूपामध्यें जाणिव समरस होऊन जाते, आणि स्वानुभवयोगी जो आहे त्याचें एकछत्री राज्य होतें. (८)

सदा स्वानंदाचे सोहळे ॥
विषयविजाती वितळे ॥
स्वरूपसुखाचेनि मेळें ॥
इंद्रियां तृप्ती ॥ ९ ॥

मग त्या एकछत्री राज्यांत सदासर्वकाळ स्वानंदसोहळे चालू होतात, आणि स्वरूपसुखाच्या गर्दीनें इंद्रियांची तृप्ति होऊन, त्यांच्या अनेक जातींच्या विषयवासना वितळूनच जातात. अर्थात् नाहींशा होतात. (९)

परमसुखाचेनि भरें ॥
एकही स्फूर्ति न स्फुरे ॥
कार्यजाती विसरे ॥
निमिषांत ॥ १० ॥

आणखी असा प्रकार होतो, कीं, या परमसुखाच्या भरानें एका क्षणार्धांत सर्व प्रकारच्या कार्यजाली विसरून एकही स्फूर्ति स्फुरण पावत नाहीं. (१०)

करूनि यज्ञांचिया कोडी ॥
उभविती स्वर्गाची गुढी ॥
तें सुख कीजे कुर्वंडी ॥
या ब्रह्मसुखासी ॥ ११ ॥

या स्वानुभवसुखाची महती इतकी मोठी आहे, कीं, कोट्यवधि यज्ञ करून स्वर्गांत गुढी उभी करणारांचें सुख या ब्रह्मसुखावरून कुर्वंडी करून ह्मणजे ओंवाळून टाकण्यासारखें आहे. (११)

आनंद आनंदासीं घोंटी ॥
बोलतां परेसी पडे मिठी ॥
मुक्यानें सुखाच्या गोष्टी ॥
कैंवि कीजे ॥ १२ ॥

या ब्रह्मसुखप्राप्तींत आनंदच आनंदाला घोंटायाला लागतो, बोलतांना परावाचाही बंद पडते, तर मग मुक्यानें या सुखाच्या गोष्टी करतां कशा याव्या? (१२) करतांच येत नाहींत.

खुंटलें मनाचें जाणणें ॥
तें सुख अनुवादावें कवणें ॥

कारण या सुखाचा प्रकार मनालाच जर आकलन करतां येत नाहीं, तर तेथें अमुक प्रकारचें सुख आहे असें तरी

हें अनुभवी तोचि जाणे ॥
इतरां टकमक ॥ १३ ॥

कोणाला सांगतां येणार आहे? हा सुखसोहाळ्याचा प्रकार अनुभवी जो आहे त्यालाच कळतो, बाकी इतरांच्या तोंडास पाणीच अथवा टकमक. (१३)

इति श्रीपरमामृते मुकुंदराजविरचिते स्वानुभवसुखवर्णनं नाम द्वादशप्रकरणं संपूर्णम् ॥ १२ ॥

---

# प्रकरण १३ वें.

## मुक्तिरहस्य.

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीगुरुभ्यो नमः ॥

ऐशी पावोन योगखूण ॥
स्वानंद भोगितो परिपूर्ण ॥
तया योगिया न घडे शीण ॥
संसाराचा ॥ १ ॥

मागच्या प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें मुक्तिलक्षणें होऊं लागलीं ह्मणजे योगी स्वानंदभोगांत परिपूर्ण अथवा निमग्न असल्यानें त्याला संसाराचा शीण घडत नाहीं. (१)

झाले ब्रह्म आपण ॥
योगी सहज परिपूर्ण ॥
सदा स्वानंदनिमग्न ॥
ज्ञप्तिमात्र ॥ २ ॥

तेव्हां तो ब्रह्मच आपण स्वतः होत असल्यानें तो सहजीं परिपूर्ण होतो, आणि त्या योगानें सदा स्वानंदमग्न असून ज्ञप्तिमात्र राहातो. (२)

संकल्प आणि विकल्प ॥
दोनी न दिसती अल्प ॥
सुख पावलें अमूप ॥
ह्मणोनियां ॥ ३ ॥

त्या योगानें अमूप सुखप्राप्ति होत असल्यानें अल्प संकल्प आणि विकल्प हे त्याला दिसेनासेच होतात. (३)

साधन असाधन खुंटलें ॥
अकरणें करणें मोडलें ॥
आपणचि ते झाले ॥
परब्रह्म ॥ ४ ॥

आणि आपणच ब्रह्म होऊन गेल्याकारणानें त्या योग्याला साधन असाधन, व करणें अकरणें कांहींच रहात नाहीं.(४)

| | |
|---|---|
| नाहीं धारणा ध्यान ॥<br>नाहीं समाधि आसन ॥<br>चुबुकुळित आनंदघन ॥<br>आपणामाजीं ॥ ५ ॥ | कोणाचें ध्यान त्याला कर्तव्य रहात नाहीं, समाधियोग अथवा आसनयोग त्याला कांहीं कर्तव्य ह्मणून रहात नाहीं; कारण तो आपल्यामध्येंच चुबुकुळित आनंदघन बनून जातो. (५) |
| भुवनत्रयीं क्रीडती ॥<br>स्वइच्छा वर्तती ॥<br>अखंड स्फुरे ज्ञप्ति ॥<br>ह्मणोनियां ॥ ६ ॥ | आणि त्याला अखंड स्फूर्ति असल्या-कारणानें स्वइच्छेनें वर्तन करून भुवन-त्रयांत तो क्रीडा करितो. (६) |
| विधिनिषेधांची कडसणी ॥<br>न वर्ते जयांच्या अंतःकरणीं ॥<br>पापपुण्यांची काहाणी ॥<br>तेही नेणती ॥ ७ ॥ | कारण त्याच्या अंतःकरणांत विधीची अथवा निषेधाची बाबच रहात नसून पापपुण्यांच्या गोष्टी तो जाणतच नाहीं. ह्मणजे त्या त्याच्यापुढें येत नाहींत. (७) |
| शुभाशुभ फळें ॥<br>न बाधती कवणे वेळे ॥<br>ते सर्वांपासून सुटले ॥<br>जीवन्मुक्त ॥ ८ ॥ | त्यामुळें शुभ अथवा अशुभफलप्राप्ती-पासून त्याला कोणत्याच प्रकारचा विकार होत नाहीं; कारण योगी सर्वांपासून सुटला असून जीवन्मुक्त बनलेला असतो. (८) |
| बंधमोक्षांची वार्ता ॥<br>नायकती सर्वथा ॥<br>सहजचि ध्याती शाश्वता ॥<br>अखंडितासी ॥ ९ ॥ | अर्थात् जीवन्मुक्त बनला असल्या-कारणानें त्याचें ध्यान सहजींच अखंडित शाश्वतापाशींच लागून राहिलें असल्या-कारणानें बंध आणि मोक्ष यांची वार्ताच त्याच्या कानावर जात नाहीं. (९) |
| जे मनापासोनि सुटले ॥<br>तयां संशय नुरले ॥<br>करणीय अकरणीय गेलें ॥<br>सर्व वर्म ॥ १० ॥ | कारण मनाच्या चेष्टा बंद करून जो पुढें गेला, त्याला कांहीं संशयच उरत नसल्याकारणानें सर्व वर्मासहित करणीय आणि अकरणीय अशा गोष्टीच कांहीं त्याच्याजवळ रहात नाहींत. (१०) |

ऐसें होऊनि निभ्रांत ॥
कळों न देती आपुला अंत ॥
लोकांमाजी दावित ॥
भक्तिरहस्य ॥ ११ ॥

अशा प्रकारची अंतःकरणांत निभ्रांत तयारी झाली असतां लोकांत भक्तिरहस्य दाखवून योगी आपला अंत लोकांना कळूं देत नाहींत. (११)

भक्ति ज्ञान वैराग्य पाहीं ॥
करूनी दाविती आपुले देहीं ॥
जगासी लाविती सोयी ॥
तारक ते ॥ १२ ॥

तर भक्ति, ज्ञान, वैराग्य इत्यादि प्रकार आपल्या देहानें करून जगाला तारक अशा मार्गाला तो योगी लावतो. (१२)

भोगिती स्वरूपरहस्य ॥
करितां सद्गुरूचें दास्य ॥
परि भेद नाहीं समरस्य ॥
जाणती जीवेश्वराचें ॥ १३ ॥

सद्गुरूचें दास्य ह्मणजे सेवा करीत असतां जीवईश्वरांत भेद नसून समरस असें जें स्वरूपरहस्य त्याचा भोग घेत असतो. (१३)

प्रेमें स्फुंदती नित्य ॥
स्मरणविस्मरणेंविण नेमस्त ॥
क्षणक्षणा उच्चारित ॥
नाम गुरूचें ॥ १४ ॥

अशा प्रकारें सद्गुरूच्या सेवाधर्मांत निमग्न असतां सदा प्रेमानें स्फुंदस्फुंदून स्मरणविस्मरणाशिवाय नेमानें क्षणक्षणां सद्गुरूच्या नामाचा तोंडानें उच्चार करीत असतो. (१४)

गुरुपरमेश्वरऐक्यता ॥
तद्रूप जाणोनि भजतां ॥
सन्मान देती संतां ॥
अतिप्रीतीनें ॥ १५ ॥

योगी सद्गुरूला परमेश्वररूप मानून संतमंडळाला अति प्रीतीनें सन्मान देऊन भजतो. (१५)

आणि विश्वामाजी ईश्वरू ॥
एकचि व्यापक सद्गुरू ॥
ह्मणोनि सर्वां भूतीं आदरू ॥
करिती ते ॥ १६ ॥

योगी अशा प्रकारचें वर्तन करतात त्याचें कारण असें आहे, कीं, विश्वामध्यें ईश्वर एकच व्यापक सद्गुरु असल्यामुळें सर्व भूतमात्रीं ते आदरपूर्वक वर्तन करतात. (१६)

हृदय जयाचें कोमळ ॥
सदा शुचिष्मंत निर्मळ ॥
निरंतर आचारशीळ ॥
पवित्रपणें ॥ १७ ॥

कारण त्याचें हृदय अतिकोमळ असतें, आणि सदासर्वकाळ शुचिष्मंत आणि निर्मळ आणि पवित्रपणानें निरंतर आचारशील असें असतें. (१७)

न पाहती मानापमान ॥
निंदा स्तुती समान ॥
धैर्यपणें मन ॥
नांदत जयांचें ॥ १८ ॥

ते आपला मानापमान कांहीं पहात नसून निंदास्तुतींची किंमत त्यांच्याजवळ एकतोलाचीच असते, आणि त्यांचें मन धैर्यानें जसें कांहीं भरलेलेंच असतें. (१८)

सुख दुःख न गणी ॥
समाधान लाभहानी ॥
उदार ते अंतःकरणीं ॥
न गुंतती कोठें ॥ १९ ॥

सुखदुःखांची त्यांना परवाच नसते, त्यामुळें लाभ आणि हानि हे प्रकार त्यांच्या जवळ नसून सदा समाधानवृत्ति असल्यानें आणि कोठें गुंतत नसल्या-कारणानें अंतःकरणाचे ते मोठे उदार असतात. (१९)

सदा विवेकी चित्तवृत्ती ॥
पडों न देती विस्मृती ॥
सावधान अहोराती ॥
आत्मस्वरूपीं ॥ २० ॥

त्यांच्या चित्तांत सदा विवेक अस-ल्याकारणानें ते आपल्याला विस्मृति कधींही होऊं देत नाहींत. त्या योगानें आत्मस्वरूपाच्या ठायीं अहोरात्र ते साव-धान असतात. (२०)

कां धरी पिशाचलीला ॥
तरी होय जगावेगळा ॥
लोकां न दाखवी डोळां ॥
शहाणपण ॥ २१ ॥

कांहीं योगी पिशाचलीला धारण क-रून जगाच्या वेगळे होतात, त्यांत मुद्याची गोष्ट इतकीच असते, कीं, आपलें शहाणपण अर्थात् योगीपण लोकांच्या डोळ्यांला दिसूं नये. (२१)

इत्यादि आचार दाविती ॥
फळापेक्षा न भाविती ॥
लोकांसी देखी लाविती ॥
वर्तती ऐसे ॥ २२ ॥

योगी लोक अशा प्रकारचे बाह्याचार दाखवून फलापेक्षा न धरतां आपल्या वर्तनाची रीत लोकांच्या पुढें लावून ठेवतात. (२२)

| | |
|---|---|
| विश्वसाक्षी योगिराणा ॥<br>जाणे सर्वांतरींच्या खुणा ॥<br>परी तो वाटे जना ॥<br>वेडियाऐसा ॥ २३ ॥ | तथापि विश्वसाक्षी योगिराज असल्यानें सर्वांच्या अंतरांतल्या खुणा जाणतो, परंतु तो आचारविचारांच्या वर्तनानें लोकांना वेड्यासारखा दिसतो. (२३) |
| असे तरी लोकांमाजी ॥<br>परी वर्मक्रिया सर्व त्यजी ॥<br>राहे सहजासहजीं ॥<br>निष्कर्मपणें ॥ २४ ॥ | योगी तरी लोकांतच राहातो, तथापि सर्व वर्मक्रियांचा त्याग करून निष्कर्मपणानें तो सहजासहजीं जगांत असतो.(२४) |
| आपण एक सर्वेश्वरू ॥<br>कोणा सांगेना व्यवहारू ॥<br>क्रिया कर्म न सांगे करूं ॥<br>नाथिलेंचि ॥ २५ ॥ | तो आपण एक सर्वेश्वर बनून राहिलेला असतो, तथापि कोणाला व्यवहार सांगत नाहीं, अथवा खोटीं क्रियाकर्मे करण्याला सांगत नाहीं. (२५) |
| उग्र खळता दावितसे ॥<br>तेणें लोक हांसतसे ॥<br>हेंहि तया नाहीं पिसें ॥<br>अद्वैतपणें ॥ २६ ॥ | परंतु आपल्या आंगांत उग्र खळता ह्मणजे अत्यंत मूर्खपणा दाखवीत असल्याकारणानें लोक त्याला हांसतात, तथापि तो अद्वैतपणानें वागणारा असल्याकारणानें त्याला आपल्याबद्दल लोकांच्या हंशाविषयीं कांहीं वाटत नाहीं. (२६) |
| ऐशिया स्थितीं राहावें ॥<br>स्वरूप जाणोनि भोगावें ॥<br>जन उद्धरावे कीं त्यजावे ॥<br>न स्मरे तो ॥ २७ ॥ | अथवा स्वरूप जाणून स्वरूपभोगांत असेंच रहावें आणि जनाचा उद्धार करावा, अथवा जनाचा त्याग करावा या गोष्टीही त्याला स्मरत नाहींत. (२७) |
| विश्व आपण भोगो न भोगो ॥<br>परी स्वरूप तया सांगो ॥<br>हें कांहीं न दे लागों ॥<br>आपणाकडे ॥ २८ ॥ | अथवा आत्मस्वरूपानें आपण सर्व विश्वाचा भोग घेत आहों अथवा नाहीं, असें सांगण्याचा संबंध देखील तो आपलेकडे लागूं देत नाहीं. (२८) कारण- |

| | |
|---|---|
| विश्वाचा दाहो न लागे आंगा ॥<br>तो द्वंद्वातीत पैं गा ॥<br>एकदेशिया जगा ॥<br>न पाहे योगी ॥ २९ ॥ | तो योगी "द्वंद्वातीत" अर्थात् अद्वैत झाला असल्याकारणानें तो विश्वाचा 'दाहो' ह्मणजे संबंध आपल्याकडे येऊं देत नाहीं. ह्मणून योगी एकदेशीयपणानें जगाला पहात नाहीं. (२९) |

इति श्रीपरमामृते मुकुंदराजविरचिते मुक्तिरहस्यनिरूपणं नाम त्रयोदशमप्रकरणं संपूर्णम् ॥ १० ॥

---

## प्रकरण १४ वें.

## साक्षात्कार.

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीगुरुभ्यो नमः ॥

| | |
|---|---|
| तूं संशय न धरीं ॥<br>मुक्त वर्तती दोहीं परी ॥<br>परी तूं अभ्यास करीं ॥<br>सांगितला ऐसा ॥ १ ॥ | मुक्त जे आहेत ते व्यवहारदृष्ट्या अति चोखपणानें वागतात, व कांहीं पिशाचवृत्तीनेंही वागतात; असे मुक्तवर्तनाचे दोन प्रकार दिसतात, तथापि तूं मनांत संशय न धरितां सांगितल्याप्रमाणें अभ्यास करित जा. (१) |
| तैसा सहजचि अससी ॥<br>परी आलें पाहिजे प्रत्ययासी ॥<br>मग तूं ज्ञानीच होसी ॥<br>जैसा तैसा ॥ २ ॥ | अभ्यास करायाला पाहिजे, त्याचें कारण इतकेंच कीं, स्वरूप हें साहजिकच तूं आहेस खरें, परंतु तें प्रत्ययाला आलें पाहिजे. तें स्वरूप प्रत्ययाला येऊं लागलें ह्मणजे तूंच ज्ञानी बनतोस. (२) |
| पाहें पां शेंदाडें पिकलीं ॥<br>तीं काय देटींहून सोडविलीं ॥ | याला उदाहरण शेंदाडांचेंच; देंटापासून सुटलीं ह्मणजे शेंदाडें पिकलीं हा जसा खुणेचा प्रकार आहे, ह्मणजे शेंदाडें पिक- |

तैशी दशा जरी झाली ॥
तरी राहिलें ध्यान ॥ ३ ॥

त्यावद्दल संशय नाहीं, त्याचप्रमाणें स्वरूप प्रत्ययाला येऊं लागलें ह्मणजे तो ज्ञानी होतो. तथापि ज्ञानी जरी झाला, तरी ध्यानमार्ग राहतोच, अर्थांत त्याला ध्यान-योग केलाच पाहिजे. (३)

तंववरी सांगितलिया रीतीं ॥
स्वरूप ध्याइजे अतिप्रीतीं ॥
तरीच साधे परमप्राप्ती ॥
सत्य जाण ॥ ४ ॥

ह्मणून पुरा अभ्यास होईपर्यंत जर अति प्रीतीनें स्वरूपध्यान केलें, तर सत्य सत्य परमप्राप्तीचा लाभ होईल. (४)

नित्य करावा ऐसा नेम ॥
पडों न द्यावा संसारश्रम ॥
धरावा स्वरूपाचा काम ॥
साधनपंथ ॥ ५ ॥

ह्मणून नित्यनेमच असा करावा, कीं संसाराचा श्रम न होईल. अशा तऱ्हेनें स्वरूपप्राप्तीविषयीं कामना धरून साधन-पंथाला लागावें. (५)

हें नित्य श्रवण करावें ॥
मनन निदिध्यासें अनुभवावें ॥
आळस करून न दवडावें ॥
आयुष्य वृथा ॥ ६ ॥

साधनपंथ ह्मटला ह्मणजे स्वरूपप्राप्ती-विषयीं जे जे प्रकार सांगितले आहेत, त्यांचें श्रवण करून मनन करावें; आणि तोच निदिध्यास करून त्याच्यायोगानें स्वरूपसुख अनुभवावें; परंतु या कामीं आळस करून आयुष्याचा व्यर्थ व्यय करूं नये. (६)

येविषयीं जो आळसी ॥
तयां परमप्राप्ती न होय कल्पांतें-
सीं ॥ तो सद्गुरूचा उपदेशी ॥
ह्मणोंचि नये ॥ ७ ॥

कारण याविषयीं जर कोणी आळस करील, तर त्याला कल्पांतींही परमप्राप्ति होणार नाहीं, आणि अशा आळशाला सद्गुरूचा उपदेशीहि कधीं ह्मणूं नये. (७)

आतां असो वहु वोलणें ॥
श्रीगुरूसी धरीं जीवें प्राणें ॥
नाहीं सार तयाविणें ॥
अन्य कांहीं ॥ ८ ॥

आतां थोडक्यांत इतकेंच लक्षांत ठेवा-याचें कीं, श्रीसद्गुरूला जीवप्राणानें धर, कारण त्याच्यावांचून जगांत सार असें दुसरें कांहींच नाहीं. (८)

तयाचे वचनीं राहीं ॥
करूं नको येर कांहीं ॥
तरी अनायासें स्वरूप पाहीं ॥
पावशी तूं ॥ ९ ॥

ह्मणून आणखी कांहीं न करतां एका सद्गुरुवचनानें रहा, ह्मणजे आयासावांचून स्वरूपाला तूं जाऊन पोंचशील. (९)

वृद्धि पावे गुरुकृपा ॥
ऐशिये स्थितीं राहें पां ॥
गुरु कष्टी होय बापा ॥
ऐसा न वर्तें ॥ १० ॥

याजकरतां सद्गुरुकृपा वृद्धि पावेल अशा स्थितीनें रहा, परंतु श्रीगुरु कष्टी होईल अशा तऱ्हेचें वर्तन कधींही करूं नकोस. (१०)

गुरुमहिमा अपारू ॥
गुरू तोचि परात्परू ॥
तुज न कळे ह्मणोनि परिहारू ॥
देऊन सांगों ॥ ११ ॥

बावा, गुरु परात्पर ह्मणजे परावाचेच्याही पलीकडचा असल्याकारणानें गुरुमहिमा अपार आहे; त्याच्या महिमेचा अंतच लागत नाहीं; तो तुला न कळणारा असल्याकारणानें उदाहरणें देऊन सांगावा लागतो. (११)

आतां तन मन धन ॥
करीं सद्गुरूसीं समर्पण ॥
नाहीं तयाविण ॥
अन्य दैवत जगीं ॥ १२ ॥

गुरुवांचून अन्य दैवतच जगांत कोणी नाहीं, एवढ्याकरितां कर काय, कीं तन, मन आणि धनही सद्गुरूला अर्पण कर. (१२)

गुरु तत्पद शिव ॥
शिष्य त्वंपद जीव ॥
ह्मणोनि तयाचे चरणीं भाव ॥
धरीं ऐक्यतेचा ॥ १३ ॥

गुरु ह्मणजे तत्पदवाचक शिव, आणि शिष्य ह्मणजे त्वंपदवाचक जीव असा प्रकार असल्यानें दोन्ही पदांच्या ऐक्यतेचा भाव धरून श्रीगुरुचरण धर. (१३)

गुरु तत्पद सागरू ॥
शिष्य त्वंपद तरंगाकारू ॥

ह्मणजे होईल काय, कीं तत्पदवाचक शिव गुरु सागर असल्यानें त्वंपदवाचक जीवाला ते तरंगाकार करतील, आणि मग सागर आणि तरंग ह्मणजे शिव

| | |
|---|---|
| दोन्हीं हारपोनि ब्रह्म निर्विकारू<br>आपण होइजे ॥ १४ ॥ | आणि जीव हे दोन भेद हारपून जाऊन तूं स्वतःच ब्रह्म निर्विकाररूप होशील. (१४) |
| गुरुभयें प्रेम वाहासी ॥<br>तरी अवश्य स्वरूप पावसी ॥<br>कीटकभयें आळीसी ॥<br>कैसें झालें ॥ १५ ॥ | असें निर्विकार ब्रह्मस्वरूप होण्याकरतां कीटक ह्मणजे भ्रमराचें निरंतर भय बाळगल्याच्या योगानें आळी ह्मणजे एक प्रकारचा कुंभारीण नांवाचा किडा त्यांगानें भ्रमरच जसा होतो, त्याप्रमाणें प्रेमानें गुरुभयांत अस. (१५) |
| आळिशी कीटकता ॥<br>गुरु देईल सायुज्यता ॥<br>मग सुखिया होशी तत्वतां ॥<br>स्वरूपीं रमशी ॥ १६ ॥ | ह्मणजे कुंभारणीला जशी भ्रमरता प्राप्त झाली, त्याचप्रमाणें सद्गुरु प्रेमभयाच्या कारणानें तुला सायुज्यता देतील. त्या सायुज्यप्राप्तीच्या योगानें तुला सुख प्राप्त होऊन, तूं आपल्याला स्वरूपींच रममाण होशील. (१६) |
| तत्वतां स्वरूपीं भेद नाहीं ॥<br>परी तें ध्यानैकगम्य पाहीं ॥<br>मग अनुभवें सुखिया होईं ॥<br>तरशी भवभय ॥ १७ ॥ | खरें पाहतां स्वरूपांत भेद नाहीं; परंतु स्वरूपांत भेद नाहीं असें गम्य ह्मणजे ज्ञानध्यानानें—सर्व वृत्तींचें ऐक्य करून—पाहावें लागतें. मग ऐक्याच्या अनुभवांत परमप्राप्ति होऊन भवभयापासून अर्थात संसारभयापासून तूं मुक्त होशील. (१७) |
| हें शास्त्र गौप्य करावें ॥<br>कवणा स्फुट न सांगावें ॥<br>तुझें तुवां अनुभवावें ॥<br>गुरुगम्य हें ॥ १८ ॥ | हें ब्रह्मविद्याशास्त्र गौप्य ठेवावें—स्फुटपणानें कोणाला कधींही सांगूं नये. परंतु या गुरुगम्य ह्मणजे गुरूपासून प्राप्त होणाऱ्या वस्तूचा अनुभव स्वतःच घेऊन पहावा. (१८) |

पशुजना श्रवणीं घालिशी ॥
तरी काय सिद्धि होय तयासीं ॥
सद्भाव देखोनि कृपा करिसी ॥
तरी निर्वाहक्कु पाहिजे ॥ १९ ॥

पशुजनांच्या श्रवणामध्यें जर हें शास्त्र घातलें, तर या शास्त्राची त्याला काय सिद्धि होईल? परंतु कोणाचा सद्भाव पाहून हें गुरुगम्य शास्त्र सांगण्याची त्याजवर कृपा करशील, तर या शास्त्राला त्या ठिकाणीं सिद्धि येईल. (१९)

जैशी गुरुमार्गींची परवडी ॥
तैशी असावी गुरुपदाची गोडी
तरी प्रकाश होतां अर्धघडी ॥
न लागे बापा ॥ २० ॥

गुरुमार्गावर जशी गोडी ठेवावयाची, त्याचप्रमाणें गुरुपदावर प्रीति ठेविली असतां आत्मज्ञानाचा प्रकाश होण्यास अर्ध्या घटकेचा देखील अवकाश लागत नाहीं. (२०)

गुरुसांप्रदायाची वाट ॥
न धरितां करिशी प्रगट ॥
तरी गुज घेऊनि चावट ॥
होतील बहु ॥ २१ ॥

ह्मणून असें होईल कीं गुरुसांप्रदायाची वाट धरल्यावांचून जर हें शास्त्र कोणाला प्रगट करशील, तर अभ्यास करून अनुभव न पाहतां त्यांतलें गुज ह्मणजे गुह्य घेऊन बरेच लोक चावट मात्र होतील. (२१)

यालागीं हृदयीं गुप्त राख ॥
स्वयें परमामृत चाख ॥
सर्व योगियांचा तिलक ॥
होशील तूं ॥ २२ ॥

याजकरतां हें शास्त्र हृदयामध्यें गुप्त राखून स्वतः परमामृताची रुचि घे, ह्मणजे सर्व योग्यांचा तिलक अर्थात अग्रेसर तूंच होशील. (२२)

परमामृत ग्रंथ प्रमाण ॥
केलें परमार्थाचें कथन ॥
जयासि पाहिजे गुरुखूण ॥
तेणें हाचि पाहावा ॥ २३ ॥

ज्याला गुरुखूण पाहिजे असेल, त्यानें परमार्थ कथन केलेला हा परमामृत ग्रंथ पहावाच पहावा. (२३)

| | |
|---|---|
| हेंचि गुरुबीजकथन ॥<br>ह्मणोनि करावें जतन ॥<br>सेवूनि सद्गुरूचे चरण ॥<br>सुखिया होइजे ॥ २४ ॥ | हाच ग्रंथ गुरुबीजाचें कथन असल्या-कारणानें त्याचें जतन करावें, आणि सद्गुरुसेवा करून सुखी व्हावें. ( २४ ) |
| ह्मणे मुकुंदराज योगिया ॥<br>ह्या बुद्धी जो अनुभविया ॥<br>तो पाहे परतोनियां ॥<br>आपुलें स्वरूप ॥ २५ ॥ | योगिराज मुकुंदराजांचा असा आशी-र्वाद आहे, कीं, वर सांगितल्या बुद्धीनें जो या ग्रंथाचा अनुभव घेईल, तो मागें पाहून अर्थात प्रत्यगावृत्ति करून आपण आपलें स्वतःचें स्वरूप पाहील ह्मणजे तो आपल्या स्वस्वरूपीं मिळेल. ( २५ ) |

इति श्रीपरमामृते मुकुंदराजविरचिते साक्षात्कारो नाम चतुर्दशप्रकरणं संपूर्णम् ॥ १४ ॥



## निर्णयसागर छापखान्यांतील मराठी पुस्तकें विक्रीस तयार.

| | कि. रु. | आ. | ट. रु. | आ. |
|---|---|---|---|---|
| भावार्थरामायण—एकनाथ महाराजकृत. ... | ८ | ० | ० | १२ |
| सदाचार. ... ... ... ... ... | ० | १२ | ० | १ |
| सार्थ परमामृत. ... ... ... ... | ० | ८ | ० | १ |
| स्वात्मानुभव—श्रीज्ञानेश्वरकृत. ... ... | ० | २ | ० | १ |
| गीता-पंचरत्न—प्राकृत ओंवीबद्ध, रे. पुठ्ठा बाइंडिंग | ० | १२ | ० | २ |
| गीता-पंचरत्न—कागदी बाइंडिंग. ... ... | ० | ९ | ० | २ |
| गीतासार—( ओंवीबद्ध प्राकृत टीकेसहित. ) ... | ० | ३ | ० | ॥ |
| सुबोधचंद्रिका सार्थ भगवद्गीता. ... ... | ० | १४ | ० | ० |
| एकादशीमाहात्म्य. ... ... ... | ० | १॥ | ० | ॥ |
| शनिमाहात्म्य. ... ... ... ... | ० | ५ | ० | ॥ |
| पांडुरंगस्तोत्र. ... ... ... ... | ० | १ | ० | ॥ |
| व्यंकटेशस्तोत्र. ... ... ... ... | ० | १॥ | ० | ॥ |
| सोळा सोमवार. ... ... ... ... | ० | १ | ० | ॥ |
| मारुतिस्तोत्र. ... ... ... ... | ० | ॥ | ० | ॥ |
| मनाचे श्लोक. ... ... ... ... | ० | ३ | ० | १ |
| सचित्र आरतीसंग्रह. ... ... ... | ० | ४ | ० | १ |
| गीतापद्यमुक्ताहार ( आवृत्ति दुसरी. ) ... ... | १ | ० | ० | २ |
| मात्रामत्तमयूरी भगवद्गीता. ... ... | ० | ८ | ० | २ |
| भगवद्गीतानुभव—साधुवर्य तुकोबामहाराजकृत. ... | ० | १ | ० | १ |
| सचित्र प्रातःस्मरण. ... ... ... | ० | १॥ | ० | १ |
| मराठी पद्यात्मक सर्पपूजा. ... ... ... | ० | १ | ० | ॥ |
| विवाहार्थदर्पण—ह्मणजे लग्नांतील कार्यक्रमाचें वर्णन. | ० | २ | ० | १ |
| आवडती वायको. ... ... ... ... | ० | १॥ | ० | १ |
| ल्हानसा गजरा. ... ... ... ... | ० | २ | ० | १ |
| श्रीदत्तकृपा. ... ... ... ... | ० | २ | ० | १ |
| चित्तवेधक साधुचरित्र. ... ... ... | ० | ४ | ० | १ |
| दादाभाई नवरोजी—कटाव. ... ... ... | ० | १ | ० | ॥ |

पांडुरंग जावजी,
निर्णयसागर छापखान्याचे मालक.